# द्वितीय स्कंध

## अध्याय १ ला

शुकाचार्य म्हणाले:—हे राजा परीक्षिता, ज्ञानोत्पत्तीचीं जीं श्रवणमननादि साधनें आहेत, त्यांमध्यें श्रेष्ठ आणि आत्मज्ञानी पुरुषांनाहि मान्य असा हा जो तूं प्रश्न केलास, त्यानें लोकांचेंहि कल्याण होण्यासारखें असल्यामुळें तो तुझा प्रश्न उत्तम आहे यांत संशय नाहीं ॥ १ ॥

राजश्रेष्ठा परीक्षिता, आत्मतत्त्वाची ओळख नसलेल्या आणि गृहसंसारामध्यें गढून जाऊन गृहस्थधर्माचें आचरण करणाऱ्या पुरुषांना सुद्धां त्या दोषांतून मुक्त होण्याकरितां श्रवण, मनन, इत्यादि हजारों साधनें आहेत ॥ २ ॥

पण हे राजा, मनुष्याचें रात्रींतील आयुष्य निद्रा घेण्यांत अथवा विषयसेवनांत निघून जातें, आणि दिवसाचा भाग द्रव्य मिळवून आपल्या कुटुंबाचें पालन-पोषण करण्यांत खर्च होतो ॥ ३ ॥

आपला देह, आपलीं मुलें, आपली स्त्री इत्यादि सर्व परिवार वस्तुतः मिथ्या आहे व तो केव्हां तरी नष्ट होणारच, हें दिसत असतांहि अज्ञानामुळें त्याला त्याचा उमज पडत नाहीं ॥ ४ ॥

याकरितां, राजा, हें मोक्षपद मिळविण्याची इच्छा करणाऱ्या पुरुषानें, संसारबंधनें नष्ट करणारा आणि स्थावरजंगम—जगतामध्यें भरून राहिलेला असा जो षड्गुणैश्वर्यसंपन्न परमेश्वर, त्याच्या गुणानुवादाचें वारंवार श्रवण करावें, त्याचें कीर्तन करावें आणि त्याचेंच स्मरण करावें ॥ ५ ॥

आपल्या धर्मावर पूर्ण निष्ठा ठेवून, आत्मानात्मविचार आणि अष्टांगयोगाचें साधन, याच्या योगानें मरणसमयीं भगवान् नारायणाचें स्मरण राहील असें करणें, हेंच पुरुषाचें जन्मास आल्याचें खरें सार्थक होय ॥ ६ ॥

हे राजा, श्रुति-स्मृति-पुराणांमध्ये अवश्य करण्यास सांगितलेलीं, तसेंच निषिद्ध म्हणून मानिलेलीं, अशीं दोन्ही कर्में सोडून देऊन, केवळ निर्गुण परब्रह्माच्या ठिकाणीं निमग्न झालेले, असे मोठे मननशील ऋषिजन सुद्धां बहुशः श्रीहरीचे गुणानुवाद वर्णन करण्यांत रमून जातात ॥ ७ ॥

राजा, हें वेदतुल्य भागवतनामक पुराण कलियुगाच्या प्रारंभीं माझा पिता जो व्यास त्याच्यापाशीं मीं पठण केलें ॥ ८ ॥

हे राजश्रेष्ठा, मी जरी परब्रह्माचें ध्यान करण्यांतच सदा निमग्न असलों, तरी भगवंताच्या लीला कानीं पडतांच माझें अंतःकरण तद्रूप होऊन गेलें. तेव्हां तशा स्थितींत जें भगवद्गुणानुवादरूप आख्यान मीं शिकलों, तें तुला तूं मोठा भगवद्भक्त असल्यामुळें सांगतों; कारण एकवार मुक्तिप्रद अशा भगवंताच्या ठिकाणीं अचल श्रद्धा बसली, म्हणजे त्याच्या विषयीं शुद्ध प्रेमळ बुद्धि उत्पन्न होते ॥ ९ ॥ १० ॥

हे राजा, ईश्वराचें नामसंकीर्तन, हें कामी पुरुषांच्या सर्व कामना पूर्ण करणारें, ज्ञानेच्छूंना ज्ञानोत्पत्ति करून देणारें आणि मोक्षेच्छूंना मोक्षप्राप्ति करून देणारें निर्भय साधन आहे, असा शास्त्रांचा सिद्धान्त आहे ॥ ११ ॥

या मृत्युलोकांत एखादा मूर्ख मनुष्य परिणामाकडे दृष्टि न देतां, पुष्कळ वर्षेंपर्यंत कांहीं निष्फळ खटाटोप करीत बसला, तर त्याचा काय उपयोग ? त्यापेक्षां दोन घटका कां होईना, ज्ञानपूर्वक जर त्यानें कोणतेंहि काम केलें तर तेंच चांगलें. कारण त्यापासूनच कल्याण होतें ॥ १२ ॥

हे राजा, खट्वांग[1] नामक राजाला, या मृत्युलोकांत आपल्या आयुष्याची मर्यादा दोनच घटका आहे असें समजलें, तेव्हां तेवढ्याच अवकाशांत सर्वसंगपरित्याग करून यानें अभयपद श्रीहरीची प्राप्ति करून घेतली ॥ १३ ॥

हे राजा, तुला तर सात दिवसांचा आयुष्याचा अवधि मिळालेला आहे; म्हणून तेवढ्या वेळांत परलोक साध्य होण्याचें जें साधन तें तूं कर ! ॥ १४ ॥

आपला अंतकाल समीप आला असें समजलें म्हणजे पुरुषानें प्रथमतः मरणाचें भय सोडावें. नंतर वैराग्यरूप शस्त्रानें आपल्या देहाची आणि तत्संबंधानें स्त्रीपुत्रादिकांची ममता तोडून टाकावी ॥ १५ ॥

नंतर मोठें धैर्य धरून, वैराग्यपूर्वक घरादाराचा त्याग करावा व पवित्र तीर्थांत स्नान करावें. मग पवित्र अशा एकांत स्थलीं शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें सिद्ध केलेल्या-आसनावर बसावें आणि मनानें शुद्ध म्हणजे संकल्प-विकल्पादि उपाधिरहित व अकारउकार-मकारांनीं युक्त अशा सर्वोत्तम ॐकाराचा जप करावा. नंतर त्या ॐकाराला न विसरतां जप करीत करीत श्वासोच्छ्वासाचें नियमन करून मनाला आपल्या स्वाधीन करून घ्यावें ॥ १६ ॥ १७ ॥

---

१ एकदां दैत्य प्रबल झाले असतां देवांच्या विनतीवरून खट्वांग राजानें त्यांचा पराभव केला व देवांना संतुष्ट केलें. तेव्हां त्यांनीं त्यासहि इच्छित वर मागण्यास सांगितलें असतां राजा म्हणाला, वर मागाहून मागेन, प्रथमतः माझ्या आयुष्याची मर्यादा सांगा.' देव म्हणाले, दोन घटिका. तें ऐकतांच तो राजा बिमानांतून जन्मभूमींत आला व श्रीहरीला शरण जाऊन त्यानें मोक्षपद मिळविलें. ( स्कंध ९, अध्याय ९, श्लोक ४१-४९ पाहा.)

नंतर सदसद्विवेकबुद्धीला पुढें करून, पुरुषानें विषयोन्मुख इंद्रियांना त्या वशीकृत मनाच्या योगानें त्या त्या विषयांपासून पराङ्मुख करावें आणि अनेक प्रकारच्या वासनांनीं व्यग्र झालेल्या मनाला, बुद्धीच्याच साहाय्यानें भगवद्रूपाचें ध्यान करण्यास लावावें ॥ १८ ॥

याप्रमाणें भगवंताच्या स्वरूपांत चित्त अढळ केल्यावर, पायांपासून मस्तकापर्यंतच्या त्याच्या एकएका अवयवाचें क्रमाक्रमानें ध्यान करावें. याप्रमाणें मनाला विषयपराङ्मुख करून भगवंताच्या रूपावर स्थिर केल्यावर दुसऱ्या कशाचेंहि स्मरण करूं नये. अशा रीतीनें ज्या ठिकाणीं मन प्रसन्न होतें, तेंच श्रीविष्णूचें श्रेष्ठ[1] स्थान होय ॥ १९ ॥

रजोगुणी व तमगुणी विषयांनीं मनाला आपल्याकडे वळवून घेतल्यामुळें तें बहकून जातें; करितां धैर्यवान् पुरुषानें धारणायोगानें[2] त्याला आवरून धरावें. धारणेच्या योगानें रज आणि तम यांनीं उत्पन्न केलेले दोष नष्ट होतात ॥ २० ॥

या धारणायोगाचा प्रभाव असा आहे कीं, आपणाला सुखाचें व आनंदाचें आश्रयस्थान मिळावें म्हणून, [ शोधून पाहणाऱ्या ] योग्यानें तो एकवार साध्य केला, म्हणजे त्याला तत्काल प्रेमलक्षणाभक्तियोगाची प्राप्ति होते ॥ २१ ॥

राजा म्हणाला :—महाराज, धारणायोग साध्य केला असतां मनुष्याचे मनोदोष झटपट दूर होऊन तें शुद्ध होतें, असें आपण म्हणतां; पण तो कोणत्या प्रकारानें आणि कोणत्या आश्रयावर साध्य करावा, म्हणजे शास्त्रसंमत असा होईल तें कृपा करून सांगा ॥ २२ ॥

---

१ " **तद्विष्णोः परमं पदं पश्यन्ति सूरयः** ॥ असें वेदामध्यें सांगितलें आहे. १६, १७, १८ व १९ या चार श्लोकांत अष्टांगयोगाच्या सर्व पायऱ्यांचें क्रमानें वर्णन आलें आहे. पातंजलयोगसूत्राच्या साधनपादांत २९ व्या सूत्रांत या पायऱ्या दिल्या आहेत त्या अशा —

**यमनियमासनप्राणायामप्रत्याहारधारणाध्यानसमाधयोऽष्टावङ्गानि ।**

या उपरोक्त श्लोकांत वैराग्यपूर्वक गृहत्याग ( यम ), पुण्यतीर्थांच्या ठिकाणीं स्नान ( नियम ), पवित्र एकान्त स्थलीं विधियुक्त एका जागीं निश्चिल बसणें ( आसन), श्वासाचा जय ( प्राणायाम ), इंद्रियांचें विषयांकडून पराङ्मुखीकरण ( प्रत्याहार ), भगवंताच्या रूपावर मनाचें स्थिरीकरण ( धारणा ), त्या रूपाच्या एकेका अवयवाचें ध्यान ( ध्यान ), आणि इतर सर्व गोष्टींचें पूर्ण विस्मरण होऊन भगवद्रूपांत मन लीन झाल्यामुळें आनंदमय होणें ( समाधि ), अशीं हीं योगांचीं आठ अंगें वर्णिलीं आहेत.

२ विशिष्ट वस्तूच्या आश्रयावर साधारणपणें चित्ताला स्थिर करणें याला धारणायोग म्हणतात आणि त्या वस्तूच्या प्रत्येक अवयवाची भावना करून त्याला पुष्टि आणणें यालाच ध्यान म्हणतात. ध्यान पुष्कळ वेळ टिकून परमानंद झाला म्हणजे तीच समाधि होय.

शुकाचार्य म्हणाले:-राजा, साधक पुरुषानें प्रथमत:सर्वसंगपरित्याग करून आपल्या इंद्रियांना वश करावें. नंतर दृढ ब्रह्मासन घालून आपले श्वासोच्छ्वास नियमित करावेत आणि मग आपलें मन निश्चयात्मक बुद्धीच्या साहाय्यानें भगवंताच्या सगुण स्वरूपावर स्थिरता पावेल असें करावें ॥ २३ ॥

भूतकाळीं होऊन गेलेलें, भविष्यकाळीं होणारें आणि वर्तमानकाळीं प्रत्यक्ष दिसणारें हें कार्यरूपी जगत् ज्या स्वरूपामध्यें विद्यमान दिसत आहे, तोच हा त्या भगवंताचा विराट् देह असून जगांतील सर्व मोठ्या वस्तूंहूनहि तो मोठा आहे ॥ २४ ॥

परमेश्वराच्या ब्रह्मांडरूप शरीरासमोर सात आवरणें असून त्यांत विराजमान असणारी जी अधिष्ठात्री देवता, तिलाच विराट् पुरुष म्हणतात आणि तोच भगवान् या धारणायोगाचें आश्रयस्थान आहे ॥ २५ ॥

या विराट्पुरुषाचे जे पायांचे तळवे त्यालाच पाताळ असें म्हणतात, त्या पायाचे जे मागील व पुढील भाग तेंच रसातल. पायाच्या ज्या दोन घोटा तें महातल आणि विराट्पुरुषाच्या दोन्ही पोटऱ्या तेंच तलातल होय, असें ज्ञाते पुरुष म्हणतात ॥ २६ ॥

हे राजा, त्या विराट्पुरुषाच्या दोन्ही जानु तेंच सुतल, दोन्ही मांड्यांचा खालचा भाग तें वितल, व वरचा भाग तें अतल, त्याचें जघन तो भूर्लोक व आकाश तें भुवर्लोक आहे, असें म्हणतात, ॥ २७ ॥

या आदिपुरुषाचें जें वक्ष:स्थल तोच स्वर्ग होय. त्याचा कंठ तो महर्लोक, मुख हा जनलोक व ललाट हा तपलोक आहे असें म्हणतात; आणि या हजारों मस्तकांच्या विराट्पुरुषांचीं जीं मस्तकें त्यांनाच सत्यलोक असें म्हणतात ॥ २८ ॥

इंद्रादिक देव हे ह्या परमेश्वराचे बाहु आहेत. दिशा ह्या त्याचे कान, शब्द त्याचें कर्णेंद्रिय, अश्विनीकुमार ह्या त्याच्या दोन नाकपुड्या, गंध हें त्याचें घ्राणेंद्रिय व प्रदीप्त अग्नि हें त्याचें मुख आहे, असें म्हणतात ॥ २९ ॥

अंतरिक्ष हेंच त्या सर्वव्यापी विराट्पुरुषाचे नेत्रगोलक होत. सूर्य हाच त्याचें चक्षुरिंद्रिय, रात्र व दिवस ह्या त्याच्या डोळ्यांच्या पापण्या, ब्रह्मलोक हाच त्याच्या भ्रुकुटींचा विस्तार, पाणी ही त्याची टाळू आणि सर्व प्रकारचा रस हीच त्याची जीभ होय ॥ ३० ॥

वेद हेच त्या विराट्पुरुषाचें मस्तक, यम ह्याच त्याच्या दाढा, पुत्रादिकांवरील प्रेम हे त्याचे दांत, लोकांना मोह उत्पन्न करणारी माया हेंच त्याचें हास्य आणि अपरंपार सृष्टि हाच त्याचा नेत्रकटाक्ष, असें म्हणतात ॥ ३१ ॥

ह्या विराट्पुरुषाचा जो वरचा ओंठ तीच लज्जा व खालचा ओंठ तोच लोभ होय. त्याचें स्तन तो धर्म, त्याचा पृष्ठभाग तो अधर्म, त्याचें शिस्न तोच ब्रह्मदेव,

---

१ ह्या श्लोकांत विराट् पुरुषाच्या देहांत चतुर्दश भुवनांचा समावेश झाला आहे हें दर्शविण्याकरितां पहिल्या दीड श्लोकांत पृथ्वीखालच्या सात पातलांचें व पुढील दीड श्लोकांत पृथ्वीवरील सात लोकांचें वर्णन केलेलें आहे.

त्याचें वृषण ते मित्रावरुण, दोन्ही कुशी ते समुद्र, आणि त्याच्या अस्थींचा समूह हे पर्वत होत ॥ ३२ ॥

हे राजा, या जगद्रूपी विराट्पुरुषाच्या नाड्या त्याच नद्या समजाव्या. त्याचे शरिरावरचे केश ते सर्व वृक्ष होत. श्वासोच्छ्वास तोच महाबलवान् असा वायु, त्याचें गमन तोच काल व क्रीडा तोच प्राण्यांचा संसार होय ॥ ३३ ॥

राजा, मेघ हे त्या विराट्रूपी परमेश्वराचे केश होत. संध्या ही त्याचें वस्त्र व प्रकृति त्याचें हृदय होय. तसेंच सर्व विकारांचें भांडार जें मन तोच चंद्र असें म्हणतात ॥ ३४ ॥

महत्तत्त्वाला त्या विराट्पुरुषाचें चित्त व रुद्रदेवतेला त्याचें अंतःकरण म्हणतात. घोडे, खेचर, उंट व हत्ती हीं त्याचीं नखें आणि सर्व जातीचे हरिण व गाई, म्हशी वगैरे पशु हीं त्याच्या कमरेचे ठिकाणीं कल्पिलीं आहेत ॥ ३५ ॥

सर्व पक्षिगण हे त्याचें नामरूपादि स्पष्ट करून दाखविणारें विचित्र शिल्पशास्त्र, स्वायंभुव मनु ही त्याची बुद्धि व मनुष्य हें त्याचें राहण्याचें स्थान होय. गंधर्व, विद्याधर, चारण व अप्सरा हे त्याचे गाण्याचे स्वर असून दैत्यसमूहांत श्रेष्ठ असा प्रल्हाद ही त्याची स्मृति होय ॥ ३६ ॥

ब्राह्मण हें त्या विराट् पुरुषाचें मुख, क्षत्रिय हे त्याचे दोन्ही भुज आणि वैश्य हे त्याच्या मांड्या असून, शूद्रांनीं त्याच्या पायांचा आश्रय केलेला आहे. अनेक देवांना हविर्भागाच्या आहुत्या देऊन साध्य होणारा यज्ञप्रयोग, हेंच त्या विराट्पुरुषाचें नित्याचें कर्म होय ॥ ३७ ॥

हे राजा, ही जी एवढी ईश्वराच्या विराट्स्वरूपाच्या अवयवांची रचना मीं तुला सांगितली, तिच्याशिवाय दुसरें कांहीं सांगावयाचें राहिलेलें नाहीं. आपल्या बुद्धीच्या साहाय्यानें दृढ निश्चय करून, आपलें मन त्या विराट्स्वरूपावर स्थिर राहील असें करावें ॥ ३८ ॥

जसा एखादा पुरुष झोंपी गेला असतां स्वप्नांत त्याचा जीवात्मा स्वतःच अनेक व्यक्ति होऊन त्या त्या अनेक सुखःदुखांचे अनुभव घेतो, त्याप्रमाणेंच हा परमात्माहि सर्वांच्या अंतर्यामीं साक्षिरूपानें राहून त्यांच्या बुद्धिवृत्तीस प्रेरणा करून सर्व प्रकारचा अनुभव घेत असतो; पण तो स्वतः मात्र ज्ञानबलाच्या योगानें त्यांत बद्ध होत नाहीं. म्हणून त्या सच्चिदानंदस्वरूपी परमेश्वराचीच सदा उपासना करावी. दुसऱ्या कसल्याहि विषयावर आसक्ति ठेवूं नये. कारण त्यापासून आपला अधःपात होण्याचा संभव आहे ॥ ३९ ॥

## पहिला अध्याय समाप्त

# अध्याय २ रा

श्रीशुकाचार्य म्हणाले, —राजा, ( ही सृष्टि उत्पन्न करण्यापूर्वी जो जगत्प्रलय झाला होता, त्यांत ब्रह्मदेवाचें ज्ञानदृि नष्ट झालेलें होतें. तेव्हां त्याला मोठी पंचाईत पडली, कीं आतां कसें करावें ? तेव्हां त्यानें, मीं जो धारणायोग सांगितला तो साध्य केला ) व त्या धारणायोगें संतुष्ट झालेल्या भगवंताकडून ब्रह्मदेवाला यथार्थ ज्ञानदृष्टि आणि निश्चयात्मक बुद्धि प्राप्त झाली; आणि त्यांच्या साह्यानें त्यानें प्रलय होण्यापूर्वी जसें हें जग होतें तसेंच पुनः उत्पन्न केलें ॥ १ ॥

एकदा झोंपीं गेलेला मनुष्य जागृतावस्थेंत पाहिलेल्या अथवा ऐकिलेल्या अशा विषयावर लुब्ध झाल्यामुळें स्वप्नांत सुद्धां ज्याप्रमाणें तेच ते विषय पाहून त्यांकडे धाव घेतो व शेवटीं जागा झाल्यावर निराश होतो, त्याप्रमाणें कांहीं तरी कर्म करीत असतां, ' मी करतों हें वेदमार्गाला अनुकूलच आहे', असें समजून साधक पुरुषाचें मन अर्थ-शून्य अशा स्वर्गादि नांवांना भुलून मनोरथतरंगांत गटंगळ्या खात असतें; पण त्या मायामय मार्गानें, आशेनें भटकतां भटकतां त्याचा कोणताहि मनोरथ साध्य मात्र होत नाहीं ॥ २ ॥

हे राजा, भोग्य पदार्थ मिळविण्यांत परिश्रम किती होतात हें विचारी पुरुषानें नीट लक्षांत घ्यावें आणि मनाचा दृढ निश्चय करून सावधानपणें आपल्या निर्वाहापुरतें मात्र तें भोग्य पदार्थ मिळविण्याचे श्रम करावे; पण निर्वाह झाला असतां अधिक मिळविण्याचा आग्रह कधीं धरूं नये ॥ ३ ॥

[ परमेश्वरानें शरीररक्षणासाठीं सर्व कांहीं योजना आयती तयार करून ठेविली आहे, तिच्यासाठीं श्रमांची गरज नाहीं. पाहा कीं, ] निजण्यासाठीं पृथ्वी मोकळी असतां गाद्यांची खटपट कशाला पाहिजे ? स्वतःचे बाहु उशाला घ्यावयाला असल्यावर उशांची काय गरज आहे ? पाणी पिण्यासाठीं व अन्न खाण्यासाठीं ओंजळी सिद्ध असतां अनेक-प्रकारचीं भांडीं तरी कशाला पाहिजेत ? तसेंच अंग झांकावयास दिशारूप वस्त्रें आणि वल्कलें सिद्ध असतां उंची रेशमी वस्त्रें मिळविण्याची खटपट कां करावी ? ॥ ४ ॥

रस्त्यावर काय फाटकीं वस्त्रें पडलेलीं नसतात ? कीं फळें देऊन दुसऱ्यांचें पोषण करणारे वृक्ष काय फलभिक्षा देत नाहींसे झाले ? नद्या काय साऱ्या सुकून गेल्या ? पर्वतांच्या गुहा काय कोणी अडविल्या ? आणि समजा, या साऱ्या वस्तूहि दुर्मिळ झाल्या; तरी पण भगवान् श्रीहरीनें शरणागताचें रक्षण करण्याचें व्रत तर सोडलें नाहीं ना ? मग तो आपलें योगक्षेम चालवीत असतां विचारशील पुरुषांनीं पोटासाठीं धनमदानें अंध बनलेल्या लोकांचें आर्जव करण्याचें काय बरें कारण आहे ?॥ ५ ॥

यास्तव आपल्याच अंतःकरणांत निवास करणारा स्वतःसिद्ध जो सर्वप्रिय, सत्यस्वरूप व अविनाशी असा भगवान् आत्मा आहे, त्याचें निश्चित मनानें आणि आनंदानें भजन करीत राहावें. कारण तसें केल्यानेंच, संसाराला कारणीभूत झालेल्या मायेचा नाश होतो ॥ ६ ॥

उलट, प्राणी वैतरणी नदींत पडून जिवंतपणीं केलेल्या आपल्याच कर्मांचीं फळें भोगीत आहे, असें प्रत्यक्ष दृष्टीस पडत असतां, पशूवांचून दुसरा कोण श्रीहरीचें चिंतन करणें सोडून देऊन विनाशी अशा विषयांचें चिंतन करील ? ॥ ७ ॥

यास्तव कित्येक विरक्त योगी आपल्याच देहाच्या हृदयाकाशांत वास करणाऱ्या टीचभर प्रमाणाच्या व हातांत शंख, चक्र, गदा व पद्म, हीं आयुधें धारण करणाऱ्या चतुर्भुज पुरुषाचें धारणायोगानें स्मरण करतात ॥ ८ ॥

( हे राजा, ह्या पुरुषाचें स्वरूप कसें कसें ध्यानांत आणावें तें आतां सांगतों, ऐक. ) त्याचें मुख स्मितयुक्त असून, नेत्र कमलाप्रमाणें विस्तृत आहेत व त्यानें कदंबकेसरांप्रमाणें पिंगटवर्णाचीं वस्त्रें परिधान केलीं आहेत. तसेंच त्यानें रत्नजडित बाहुभूषणें धारण केलीं आहेत आणि रत्नजडित मुकुट मस्तकावर घातला असून तशींच तेजस्वी कुंडलें कानांत घातलीं आहेत, असें मनांत आणावें. महान् महान् त्याच्या चरणकमलांची आपल्या प्रफुल्लित अशा हृदयकमलाच्या कोशांत स्थापना करतात, लक्ष्मी त्याचें चिन्ह आहे, त्यानें आपल्या कंठांत कौस्तुभमणि आणि कधींहि न कोमेजणारी अशी वनमाला धारण केली आहे, पायांत महामूल्यवान् नूपुरें, हातांत कंकणें, कमरेंत कमरपट्टा आणि बोटांत अंगठ्या घातल्या असून त्याचे केंस स्निग्ध, स्वच्छ, कुरळे आणि नीलवर्णाचे आहेत व त्याच्या मुखावर सुंदर हास्य चमकत असून अलंकारांमुळें त्याच्या शरीराला विशेषच रमणीयता आलेली आहे, अशी कल्पना करावी. तसेंच तो पुरुष आपल्याकडे उदारपणें लीलायुक्त कटाक्ष फेंकीत आहे व त्यायोगें आपल्यावर कृपा करण्यास अगदीं उद्युक्त झाल्याचें सुचवीत आहे, असें कल्पून ध्यानयोगानें मनश्चक्षूपुढें उभ्या केलेल्या अशा प्रकारच्या त्या सर्वसमर्थ श्रीभगवंताच्या मूर्तीकडे मन स्थिर होईपर्यंत एकाग्रतेनें पाहात रहावें ॥ ९ ॥ १० ॥ ११ ॥ १२ ॥

त्या गदाधारी भगवंताच्या पायांपासून हास्ययुक्त मुखापर्यंत एकएका अवयवाची बुद्धीनें क्रमाक्रमानें भावना करावी. अशी भावना करतां करतां जसजशी बुद्धि शुद्ध होऊन निश्चल होत जाईल, तसतसा आपल्या स्वाधीन झालेला तो अवयव सोडून पुढील एकेका अवयवाचें ध्यान करावें ॥ १३ ॥

हे राजा, त्या साक्षिरूप सर्वोत्तम विश्वेश्वराच्या ठिकाणीं प्रेमलक्षणा भक्ति उत्पन्न होईपर्यंत, नित्य कर्म संपल्यावर त्या विराट्पुरुषाच्या स्वरूपाचें पवित्रान्तःकरणानें ध्यान करावें ॥ १४ ॥

राजा, अशा रीतीनें जेव्हां आसन स्थिर आणि सुखदायक असें होईल, तेव्हां त्याच्या आश्रयानें भक्तियोग साध्य करावा. नंतर योग्याला आतां हें जग आपण सोडून जावें असें जेव्हां वाटेल, तेव्हां त्यानें प्राणांचें नियमन करावें, व काल[1] आणि देश यांचा विचार मनांत न आणतां मनानें प्राणाचा निरोध करावा ॥ १५ ॥

त्याची बुद्धि निर्मळ झालेली असतेच; त्या बुद्धीनें मनाचें[2] नियंत्रण करावें आणि मग बुद्धीलाहि देहांतील साक्षी जें आत्मस्वरूप त्याकडे कळवावें. नंतर त्या साक्षीभूत क्षेत्रज्ञ[3] जो जीवात्मा त्याला परमात्म्याकडे बळवावें. अशा रीतीनें देहस्थ आत्म्याला परमात्म्यांत लीन केल्यावर योग्याला शांति प्राप्त होते व तो मग कर्मापासून आपोआपच सर्व प्रकारें निवृत्त होतो ॥ १६ ॥

काळ हा देवांहून श्रेष्ठ खरा; पण त्याचेंहि सामर्थ्य जेथें चालत नाहीं, तेथें जगावर स्वामित्व गाजविणाऱ्या देवांची कथा काय? त्या ठिकाणीं सत्त्व, रज आणि तम, या गुणांना ठाव नाहीं. प्रकृतीचा विकार असें जें जगत् त्यालाहि ईश्वराचें स्वरूप गम्य होत नाहीं. त्याप्रमाणेंच महत्तत्त्व आणि प्रकृति यांचा सुद्धां तेथें थांग नाहीं. विष्णुपदाशिवाय इतर सर्व वस्तूंचा, तें हें नव्हे, तें हें नव्हे, असें म्हणून योगीजन त्याग करूं इच्छितात आणि त्या इतर वस्तूंविषयींचें ममत्व सोडून पूज्य अशा त्या परमेश्वराच्या चरणांना आपल्या हृदयांत नित्य दृढ धरून ठेवतात. दुसऱ्या कशावरहि ते भाव ठेवीत नाहींत. ते त्या विष्णूच्या पदालाच सर्वश्रेष्ठ असें मानितात ॥ १७ ॥ १८ ॥

याप्रमाणें प्राणायामाच्या योगानें चित्त ब्रह्माच्या ठिकाणीं नीट स्थिर झालें म्हणजे योग्याची दृष्टि पूर्ण ज्ञानमय होते; आणि त्याच्या वासना समूळ नष्ट होतात. ही स्थिति आली म्हणजे योग्यानें सर्वांचा त्याग करावा. श्रम वाटण्याचें कारण नसल्यामुळें त्यानें आसन घालून पायाच्या टाचेनें गुदद्वार दाबून धरावें आणि वायूची गति वर फिरवून त्याला तेथून क्रमाक्रमानें सहा चक्रांवर चढवीत चढवीत वर न्यावें ॥ १९ ॥

नाभिस्थानांतील मणिपूरचक्रांत आलेल्या त्या वायूला हृदयांतील अनाहतचक्रावर न्यावें. नंतर तेथून उदानवायूच्या मार्गानें उरस्थलाजवळील विशुद्धचक्रांत नेऊन तेथून पुढें मोठ्या सावधपणानें चढवीत चढवीत हळूहळू आपल्या टाळूच्या मुळाशीं आधारचक्र आहे तेथें न्यावें ॥ २० ॥

---

१ उत्तरायण हा काळ आणि पुण्य क्षेत्र हें स्थान मरणाराला मोक्षप्रापक आहे; पण ही गोष्ट सामान्य लोकांची. योग्याला त्याची अपेक्षा नाही.

२ मन संकल्पविकल्पात्मक असतें व बुद्धि निश्चयरूप असते. स्कं. २, अ. १, श्लो. १६-२० वरील टीप पाहा.

३ शरीर हेंच क्षेत्र व तें जाणणारा साक्षी आत्मा, म्हणजे क्षेत्रज्ञ. पाहा-गी. अ. १३, श्लो. १ ॥ इदं शरीरं कौंतेय क्षेत्रमित्यभिधीयते ॥ एतद्यो वेत्ति तं प्राहुः क्षेत्रज्ञ इति तद्विदः ॥

हे राजा, विशुद्धिचक्रापर्यंत वायूला चढविल्यावर, कान, डोळे, नाकपुड्या आणि मुख, हीं प्राणाचीं सात द्वारें बंद करून त्याला भुवयांच्या मध्यभागीं न्यावें. तेथें अर्ध्या मुहूर्तपर्यंत तो निश्चल राहिला म्हणजे अकुंठित असें ज्ञान प्राप्त होतें. अशा स्थितींत ब्रह्मरंध्राचा भेद करून वरच्या स्थानाला जावें, आणि या शरीराचा त्याग करावा ॥२१॥

हे राजा, जर योग्याच्या मनांत शरीरत्यागानंतर ब्रह्मलोकाला जावें अथवा आकाशगामी देवादिकांच्या क्रीडास्थानीं जाऊन अणिमा, लघिमा आदिकरून आठ सिद्धींचे[1] स्वामित्व प्राप्त करून घ्यावें किंवा सत्त्वादि गुणांच्या समुदायरूप असलेल्या या ब्रह्मांडांत फिरतां यावें, असें असेल, तर त्यानें शरीराचा त्याग करतांना, मन आणि इंद्रियें यांचा त्याग करू नये. तीं घेऊनच जावें ॥ २२ ॥

( शरीर टाकून मन व इंद्रियें तेवढीं बरोबर कशीं नेतां येतील असें तूं विचारशील तर ) वायुरूप असलेलें लिंगशरीर धारण करणाऱ्या योग्याला त्रैलोक्याच्या आंत किंवा बाहेर कोठेंहि जाण्याचें सामर्थ्य असतें, असें शास्त्रांत सांगितलें आहे; पण ज्ञान, तपश्चर्या किंवा योगसमाधि यांचें साधन करणारानांच तें सामर्थ्य येतें, नुसत्या यज्ञयागादि कर्मांनीं येत नाहीं ॥ २३ ॥

हे राजा, आकाशांतून ब्रह्ममार्गानें गेलेला योगी तेजस्वी अशा सुषुम्नानामक नाडीच्या साहाय्यानें प्रथम अग्निलोकांत जातो; तेथें त्याचें पाप नष्ट होतें आणि मग पुढें तो भगवंताच्या शिशुमारनामक चक्रावर म्हणजे ध्रुवचक्रावर जातो ॥ २४ ॥

त्यानंतर, विश्वाला आधारभूत असलेल्या त्या विष्णुचक्राला म्हणजे ध्रुवचक्राला ओलांडून फार सूक्ष्म आणि शुद्ध अशा शरिरानें योगी एकटाच पुढें जातो. तेथें ब्रह्मवेत्त्यांचें स्थान असून त्याला सर्व वंद्य मानितात व त्या ठिकाणीं कल्पावधि आयुष्य असलेले ज्ञानी पुरुष आनंदानें वास करितात ॥ २५ ॥

( ध्रुवचक्राच्या वरतीं असलेल्या ब्रह्मवेत्त्यांच्या महर्लोकांत, स्वर्गांत राहणाऱ्या देवांचा प्रवेश होत नाहीं. ) त्या ठिकाणीं शेषाच्या मुखांतील अग्नीमुळें समूळ दग्ध होत असलेलें विश्व पाहून तो योगी आणखी वरती म्हणजे ब्रह्मपदाला जातो व तेथें नित्य राहतो. त्या ब्रह्मलोकांत मोठमोठ्या योगीश्वरांचीं वसतिस्थानें असून तें दोन परार्ध वर्षे अस्तित्वांत असतें ॥ २६ ॥

---

१ आठांचें म्हणजे आठ सिद्धींचें आधिपत्य. " अणिमा महिमा चैव गरिमा लघिमा तथा ॥ प्राप्तिः प्राकाम्यमीशित्वं वशित्वं चाष्टसिद्धयः ॥ " आकारानें अतिशय लहान किंवा मोठें होतां येणें, आकारानें लहान पण वजनांत जड व आकारानें मोठें पण हलक्या वजनाचें होतां येणें, सर्व वस्तूंचें बसल्या जागीं सान्निध्य प्राप्त होणें, वाटेल ती गोष्ट इच्छेनुसार घडवून आणतां येणें, परमेश्वरासारखें उत्पत्ति, स्थिति व लय करण्याचें सामर्थ्य येणें, अशा आठ सिद्धि योगशास्त्रांत सांगितल्या आहेत.

त्या ब्रह्मलोकांत कसलेंहि दुःख नाहीं. वृद्धपणा किंवा मृत्यु यांचीहि भीति नाहीं. तसेंच तेथें कसली पीडा नाहीं व मनाला उद्वेग वाटण्याचेंहि कांहीं कारण नाहीं. केवळ हें अशा प्रकारचें ज्ञान ज्यांना नाहीं, त्या लोकांना वारंवार प्राप्त होणारें दुःख पाहून, त्यांच्याविषयीं मात्र ब्रह्मलोकांतील योग्यांना कींव वाटून खेद होतो ॥ २७ ॥

योगी[1] ब्रह्मलोकीं गेल्यावर तेथें क्रमाक्रमानें पृथ्वी आदि पंचमहाभूतांत आपल्या सूक्ष्म लिंगशरिरानें समरस होऊन क्रमाक्रमानें पुढील भूतांत प्रविष्ट होतो. प्रथम तो पृथ्वींत मिळतो, मग जलांत मिळतो आणि जलांतून मग अग्निस्वरूप होतो. तेजोरूपांतून पुढें तो वायूंत प्रवेश करतो, आणि वायुरूप झाल्यावर शेवटीं परमात्म्याचें स्वरूपच असें जें आकश त्यांत एकरस होतो. एका आवरणांतून दुसऱ्यांत जातांना त्याला कसलेंच भय नसतें आणि जातांना तो घाई सुद्धां करीत नाहीं ॥ २८ ॥

( स्थूल अशा पंचमहाभूतांशीं एकत्व पावण्याचा योग्याचा हा प्रकार झाला. आतां सूक्ष्म भूतांशीं मिळून जाण्याचा प्रकार सांगतात. ) योगी आपल्या लिंगदेहांतील घ्राणेंद्रियानें गंधांत मिळून जातो, रसनेंद्रियानें रसांत मिळतो, चक्षुरिन्द्रियानें रूपाशीं तादात्म्य पावतो, स्पर्शेंद्रियानें स्पर्शाशीं एकरूप होतो आणि कर्मेंद्रियांनीं[2] त्या त्या इंद्रियक्रियांशीं समरस होतो ॥ २९ ॥

याप्रमाणें इंद्रियांचा सूक्ष्मभूतांत लय पावल्यावर योगी अहंकार-तत्त्वांत मिळून जातो. तेथें मन आणि देवता यांचाहि लय होतो. तेथून मग तो आपल्या गतीनें त्या

१ ब्रह्मांडभेदन करण्याच्या या योगमार्गाचें स्पष्टीकरण टीकाकारांनीं पुढीलप्रमाणें केलें आहे –ब्रह्मलोकांत गेलेल्यांना तीन प्रकारच्या गति असूं शकतात. १ पूर्वपुण्यकर्मानें तेथें मोठे अधिकारी होऊन राहणें. २ हिरण्यगर्भोपासनेच्या बलानें ब्रह्मदेवाबरोबर मुक्त होणें आणि ३ भगवंताच्या उपासनेच्या सामर्थ्यामुळें वाटेल तेव्हां विष्णुलोकाला जाणें. वरील २८ व्या श्लोकांत तिसऱ्या गतीचें वर्णन दिलें आहे. हीच भगवद्भक्तांची गति होय. या ब्रह्मांडभेदनाच्या गतीची कल्पना येण्यासाठीं ब्रह्मांडगोलाच्या रचनेविषयीं कल्पना काय आहे, हें समजणें अवश्य आहे. रचनेच्या क्रमाच्या उलट, भेदनाचा क्रम असणार, हें उघड आहे. परब्रह्मस्वरूपी विष्णूच्या आश्रयानें प्रकृति राहते, प्रकृतीपासून महत्तत्व, महत्तत्वापासून सूक्ष्म आकाश, त्यापासून महदाकाश, पुढें सूक्ष्म व स्थूल या क्रमानें आकाशापासून वायु, वायूपासून तेज, तेजापासून उदक व उदकापासून शेवटीं पृथ्वी अशीं उत्पन्न होतात. हें सारें विराट-रूप होय. अर्थात् यांच्या भोंवतीं पृथ्वी, जल, तेज, वायु, आकाश, अहंकार आणि महत्तत्व अशीं सात आवरणें आहेत व ब्रह्मांडाचा भेद करून विष्णुपद गांठावयाचें म्हणजे पृथ्वीपासून आरंभ करून या सात आवरणांचा भेद केला पाहिजे. त्याच्या पलीकडे प्रकृति आणि भगवान् विष्णु हीं आहेत.

२ प्राण म्हणजे या ठिकाणीं पांच कर्मेंद्रियें वाणी, हात, पाय आणि मूत्र व मल टाकण्याचीं दोन द्वारें अशीं पांच कर्मेंद्रियें मानलीं आहेत.

अहंकारासह विज्ञानरूप महत्तत्त्वांत मिळतो आणि त्यानंतर सर्व गुणांचाहि जींत लय होतो, त्या प्रकृतीशीं तो तादात्म्य पावतो ॥ ३० ॥

योगी प्रकृतिरूप झाल्यावर शेवटीं तो आनंदरूप होऊन विकाररहित आणि आनंदस्वरूपी अशा ईश्वररूपाला प्राप्त होतो. अहो, त्या भगवत्स्वरूपाचा महिमा काय सांगावा ! जो एकदां त्या स्वरूपाला पोंचला तो पुनः ह्या संसारचक्रांत कधींहि पडत नाहीं ॥ ३१ ॥

हे राजा, तूं ज्या मोक्षमार्गाविषयीं मला प्रश्न केलास, ते हे दोन[1] मार्ग वेदांमध्यें सांगितले असून पूर्वापर चालत आले आहेत. पूर्वी ब्रह्मदेवानें भगवान् वासुदेवाला प्रश्न करून विचारलें असतां त्यानें हेच मार्ग ब्रह्मदेवाला सांगितले होते ॥ ३२ ॥

भगवान् वासुदेवाच्या ठिकाणीं ज्या मार्गानें दृढभक्ति जडेल त्याहून दुसरा श्रेयस्कर मार्ग संसारांत पडणाराला खरोखर नाहीं ॥ ३३ ॥

( उत्तम मार्ग कोणता हें ठरविण्यासाठीं ) निर्विकार अशा भगवान् ब्रह्मदेवानें तीन वेळां एकाग्रचित्तानें पूर्णपणें विचार करून शेवटीं असाच निश्चय केला कीं, ज्यामुळें परमेश्वराविषयीं भक्ति उत्पन्न होईल तोच मार्ग उत्तम होय ॥ ३४ ॥

( परमेश्वरावर भक्ति जडावयास त्याचा अनुभव तरी कोणाला येतो काय ? असा प्रश्न कोणी करील तर त्याला उत्तर असें आहे कीं ) भगवान् परमेश्वर हा सर्वांचा साक्षिभूत आहे आणि प्रत्येक प्राण्यांत आढळून येणारीं जीं मनबुद्धि[1] आदिकरून अनुमनाचीं साधनें त्यांच्या साहाय्यानें त्याच्या साक्षीभूत रूपाचें ज्ञान स्वतःच होत असतें ॥ ३५ ॥

हे राजा, या कारणास्तव मनुष्यांनीं सर्व ठिकाणीं व सर्व काळीं मनोभावेंकरून या भगवंताचें नाम श्रवण करावें, कीर्तन करावें आणि स्मरण करावें हें उचित होय ॥ ३६ ॥

साधूंच्या हृदयांत वास करणाऱ्या भगवंताचें मधुर कथारूपी अमृत, आपल्या कानांत सांठवून जे कोणी प्राशन करतात, त्यांचें मन विषयसेवनानें कितीहि दूषित झालें असलें, तरी तें शुद्ध होतें आणि भगवंताच्या चरणकमलाजवळ त्यांना स्थान प्राप्त होतें ॥ ३७ ॥

---

१ हे दोन मार्ग म्हणजे श्लोक १९ ते २१ मध्यें सांगितलेला पहिला आणि २२ ते ३१ श्लोकांत सांगितलेला दुसरा.

१ मन व बुद्धि हीं जड आहेत, अर्थात् तीं स्वतः कांहीं जाणत नाहींत. तेव्हां त्यांच्या साहाय्यानें जाणणारा असा साक्षी कोणी आहे असें अनुमान स्वाभाविक करावें लागतें.

## दुसरा अध्याय समाप्त

# अध्याय ३ रा

शुक म्हणतात, हे राजा, मनुष्यकोटीमध्यें येऊन जे ज्ञानवान् झाले, त्या पुरुषांनीं मृत्यु समीप आला असतां कसें वर्तन करावें, याविषयीं जो प्रश्न तूं मला केलास, त्याचें मीं याप्रमाणें उत्तर दिलें. ( पण मीं सांगितलेलें असें आचरण न करण्याची इच्छा करणारे लोक त्यासाठीं नाना देवतांची उपासना करण्यांत गर्क झालेले असतात त्यांचा प्रकार असा सांगितला आहे ) ॥ १ ॥

ज्यांना ब्रह्मतेज प्राप्त व्हावें अशी इच्छा असेल, त्यांनीं ब्रह्मणस्पतीची उपासना करावी. इंद्रियादिकांची पुष्टि व्हावी अशी इच्छा बाळगणारांनीं इन्द्राची उपासना करावी आणि संततीची इच्छा असेल त्यांनीं दक्षादि प्रजापतींची उपासना करावी ॥ २ ॥

ऐश्वर्याची इच्छा करणारांनीं दुर्गादेवीची आराधना करावी. तेजस्वी होऊं इच्छिणारांनीं अग्नीची उपासना करावी, द्रव्येच्छूंनीं आठ वसूंचें भजन करावें. आणि वीर्यवान व्हावें ही आकांक्षा बाळगणारांनीं रुद्रोपासना करून वीर्य प्राप्त झाल्यावरही ती करीत राहावें. अन्नपानादिकांची इच्छा असेल त्यानें अदितीची, स्वर्गप्राप्ति व्हावी म्हणून झटणाऱ्यांनीं आदित्यांची, राज्य मिळविण्याचा यत्न करणारांनीं विश्वेदेवांची आणि लोकांमध्यें मान्यता व सत्ता मिळवूं पाहाणाऱ्यांनीं साध्यनामक देवांची आराधना करावी. आपल्याला पुष्कळ आयुष्य असावें असें वाटणारांनीं अश्विनीकुमार, शरीरपुष्टीची इच्छा करणारांनीं पृथ्वींदेवी, आणि कीर्ति मिळावी असें इच्छिणाऱ्या पुरुषानें लोकमाता ज्या द्यावापृथिवीदेवता त्यांची उपासना करावी ॥ ३ ॥ ४ ॥ ५ ॥

सौंदर्येच्छूंनीं गन्धर्वांची भक्ति करावी, स्त्रीप्राप्तीसाठीं उत्सुक झालेले असतील त्यांनीं उर्वशीनामक अप्सरेचें भजन करावें आणि सर्वांवर स्वामित्व मिळावें अशी इच्छा धरणारांनीं परमेष्ठी ब्रह्मदेवाची आराधना करावी ॥ ६ ॥

कीर्ति पाहिजे असेल तर यज्ञस्वरूपी परमेश्वराची, द्रव्यभांडार हवें असेल तर वरुणाची, विद्येची इच्छा असली तर शंकराची व पतिपत्नींत उत्कट प्रेम असावें, अशी इच्छा धरणारांनीं साध्वी पार्वतीची उपासना करावी ॥ ७ ॥

आपल्या हातून धर्माचरण नीट व्हावें असें वाटल्यास पवित्र कीर्तीच्या श्रीविष्णूचें, वंशविस्ताराची इच्छा असल्यास पितरांचें, पिशाचादिकांची बाधा होऊं नये असें वाटल्यास पुण्यशील यक्षांचें, तसेंच सामर्थ्य प्राप्त व्हावें असा हेतु असल्यास मरुद्देवतांचें यजन करावें. ॥ ८ ॥

ज्याला राज्य पाहिजे असेल त्यानें मनुदेवतांची आराधना करावी. शत्रूंचा नाश व्हावा म्हणून जारणमारण इत्यादि विधि करण्याची इच्छा असेल तर निर्ऋतिनामक

राक्षसीदेवतेचें भजन करावें आणि नाना प्रकारचे विषयभोग पाहिजे असतील तर चंद्राची उपासना करावी. पण ज्याला कसलीच इच्छा नाहीं, त्यानें परम श्रेष्ठ अशा ईश्वराचीच आराधना केली पाहिजे ॥ ९ ॥

मनुष्याला कोणत्याहि प्रकारची इच्छा नसो, किंवा सर्वच गोष्टींची इच्छा असो अथवा व्यापकबुद्धीमुळें तो मोक्षाची इच्छा करीत असो, कडकडीत भक्तियोगानें त्यानें सर्व-श्रेष्ठ अशा परमेश्वराची आराधना केलीच पाहिजे ॥ १० ॥

भगवद्भक्तांच्या संगतीमुळें परमेश्वराच्या ठिकाणीं अढळ भक्ति उत्पन्न होणें, हाच या लोकांत परमेश्वराच्या उपासकांना अत्यंत कल्याणप्रद असा लाभ होय ॥ ११ ॥

हरिकथाश्रवणामुळें त्रिगुणांच्या लाटांचा समूह सर्वस्वीं मागें वळतो आणि मग अर्थातच त्यांपासून उत्पन्न झालेल्या विषयासंबंधाची कासावीस नष्ट होऊन आत्मस्वरूप-प्राप्तीचें सौख्य प्राप्त होऊं लागतें. त्यानंतरचा पुढचा सहज मार्ग म्हणजे मोक्षाप्रमाणेंच मान्य असलेला भक्तियोग होय. तेव्हां त्या हरिकथेची गोडी लागून सुखी झालेला कोणता पुरुष त्या हरिकथांत रममाण होणार नाहीं ? ॥ १२ ॥

शौनक म्हणाले, सूत हो, ह्याप्रमाणें शुकानें सांगितलेलें ऐकून त्या भरतकुलदीपक परीक्षित्राजानें वेदांतविद्येंत निष्णात अशा त्या व्यासपुत्र शुकमुनीला पुढें आणखी काय विचारलें बरें ? ॥ १३ ॥

हे ज्ञानसंपन्न सूता, तें सर्व ऐकण्याची आम्हांला फार इच्छा आहे. यास्तव तूं तें आम्हांला अवश्य सांग. खरोखर साधूंच्या सभेंत ज्या ज्या काय गोष्टी होतील, त्या सर्वांचें पर्यवसान श्रीहरीच्या कथेंतच व्हावयाचें असतें ॥ १४ ॥

तो पांडवकुलोत्पन्न महापराक्रमी परीक्षित्राजा खरोखर मोठा भगवद्भक्त होता. लहानपणीं मुलांचीं खेळणीं घेऊन खेळत असतांहि तो कृष्णाच्या लीलांचेंच अनुकरण करीत असे ॥ १५ ॥

आणि भगवान् शुकाचार्य तर नित्यच परमेश्वराच्या भजनांत तल्लीन असावयाचे. तेव्हां अशा साधूंच्या गांठी पडल्या म्हणजे अनंतकीर्ति परमेश्वराच्या गुणगायनामुळें महत्त्वास पावलेल्या अशा कथा चालू व्हावयाच्याच. ( तरी तशा ज्या कथा शुक आणि परीक्षित् यांत झाल्या असतील, त्या मला सांगा. शौनकाचा प्रश्न ऐकून सूत पुढें सांगूं लागले ) ॥ १६ ॥

पुण्यकीर्ति भगवंताच्या गुणानुवादांत जेवढा काळ जातो तेवढा वगळतां, उरलेला मनुष्यांच्या आयुष्यांतील जो काळ तो सूर्यदेव आपल्या उदयास्तांबरोबर हिरावून नेत असतो ॥ १७ ॥

( भगवद्भक्तीशिवाय जगणें म्हणजे पशूंसारखेंच राहणें होय; कारण ) केवळ जगण्याचेंच काम असेल तर वृक्ष देखील तें करीत नाहींत काय ? जगणें म्हणजे केवळ श्वासोच्छ्वास करणें असेल तर लोहारादिकांचे भातेहि तेवढें काम करतात आणि खाणें,

पिणें व मलमूत्रांचा उत्सर्ग करणें हेंच जर जगण्याचें चिन्ह असेल तर, ती गोष्ट इतर गुरांढोरांसारख्या पशूंकडून सुद्धां घडत असते ॥ १८ ॥

खरोखरच श्रीकृष्णाचे गुणानुवाद ज्याच्या कानावर कधींच पडले नाहींत तो पुरुष पशुरूप होय. त्याची कुत्रीं, डुकरें, उंट, व गाढव यांच्याशींच बरोबरी केली पाहिजे ॥१९॥

हे सूता, जो मनुष्य त्या सर्वशक्तिमान् परमेश्वराचे पराक्रम श्रवण करीत नाहीं, त्याचे कान म्हणजे केवळ दोन छिद्रें होत. तसेंच जी जीभ त्या अतुलकीर्ति परमात्म्याच्या चरित्रांचें गायन करीत नाहीं, ती दुष्ट असून निरर्थक बडबड करणाऱ्या बेडकाऱ्या जिभेसारखीच होय ॥ २० ॥

फेटा, मुकुट इत्यादिकांनीं सुशोभित झालेलें असूनहि मस्तक जर श्रीकृष्णापुढें नम्रतापूर्वक लवणार नाहीं, तर तें केवळ भारभूत होय. तसेंच तेजस्वी सुवर्णाच्या कंकणादिकांनीं मंडित असे दोन हात जर भगवंताची पूजा करणार नाहींत, तर तेहि प्रेताच्या हाताप्रमाणेंच समजावे ॥ २१ ॥

श्रीविष्णूच्या मूर्तीचें दर्शन न घेणारे मनुष्याचे डोळे म्हणजे मोराच्या पिसाऱ्यावरील डोळ्याच्या आकृतीच केवळ होत. तसेंच जे पाय भगवंताच्या पवित्र तीर्थांना गमन करीत नाहींत, ते माणसांचे नसून वृक्षाप्रमाणें जड समजावे ॥ २२ ॥

जो मनुष्य भगवंताच्या पायधुळीचा स्वीकार करणार नाहीं, तो जिवंत असूनहि प्रेतासमान होय. तसेंच श्रीविष्णूच्या पायांवर वाहिलेल्या तुळशीपत्रांचा[1] सुवास जो मनुष्य स्वीकारीत नाहीं, तोहि जिवंत मनुष्यासारखा श्वासोच्छ्वास करीत असला तरी मृतासारखाच जाणावा ॥ २३ ॥

हरिनामाचा गजर चालला असतां ज्या हृदयाला प्रेमाचा पाझर फुटणार नाहीं, तें खरोखर पाषाणमयच समजलें पाहिजे. मनावर हरिनामाचा परिणाम झाला म्हणजे नेत्रांतून प्रेमाश्रु वाहूं लागतात आणि शरिरावर आनंदाचे रोमांच उभे राहतात ॥ २४ ॥

शौनक म्हणतात, हे सूता, तूं आतांपर्यंत आम्हांला इष्ट अशाच गोष्टी सांगितल्या आहेस. तरी आतां यापुढें, भगवद्भक्तांमध्यें श्रेष्ठ आणि आत्मज्ञानांत पारंगत असा जो व्यासपुत्र शुकाचार्य, त्याला परीक्षितानें कोणते प्रश्न केले आणि त्यानें त्याला काय सांगितलें, तें सर्व तूं आम्हांला सांग ! ॥२५॥

---

१ देवावर आदले दिवशीं वाहिलेलीं फुलें, तुळशी वगैरे निर्माल्य दुसरे दिवशीं पूजा करतांना वास घेऊन नंतर टाकावा असें शास्त्रमत आहे.

**तिसरा अध्याय समाप्त**

# अध्याय ४ था

सूत म्हणाला, शौनक हो! याप्रकारचें आत्मतत्त्वाची फोड करणारें शुकाचार्याचें भाषण जेव्हां परीक्षित् राजानें मनःपूर्वक ऐकलें, तेव्हां त्यानें श्रीकृष्णाच्या ठिकाणीं दृढ भक्ति ठेवण्याचा निश्चय केला ॥ १ ॥

त्यानें आपलें शरीर, स्त्री, पुत्र, घर, हत्ती, घोडे इत्यादि पशु, द्रव्य, भाऊबंद, तसेंच आपलें निष्कंटक रीतीनें चाललेलें राज्य, या सर्वांवर असलेलें प्रेम सर्वस्वी सोडून दिलें ॥ २ ॥

साधुश्रेष्ठ शौनक हो, परीक्षित् राजाला श्रीकृष्णाचें माहात्म्य ऐकण्याची मोठी इच्छा होती. यास्तव तुम्हीं मला जो प्रश्न आतां विचारला, तोच त्या थोर मनाच्या राजानें शुकाचार्यालाहि विचारला ॥ ३ ॥

आपला मृत्यु जवळ आलेला आहे असें जेव्हां त्यानें जाणलें, तेव्हां धर्म, अर्थ आणि काम ह्यांसंबंधाचें सर्व कर्म त्यानें सोडून दिलें. भगवान् श्रीकृष्णाच्या ठिकाणीं त्याच्या मनांत आपलेपणाचा दृढभाव उत्पन्न झाला ॥ ४ ॥

मग तो शुकाचार्यांना म्हणाला—हे निष्पाप द्विजा, तूं सर्व जाणणारा असल्यामुळें तुझें भाषण अगदीं उत्तमच आहे. कारण तूं मला श्रीहरीच्या कथा सांगत असतांना माझें अज्ञान नष्ट होतें ॥ ५ ॥

ब्रह्मदेवासारख्या समर्थ अशा देवांच्या सुद्धां कल्पनेच्या आवांक्याबाहेर असलेलें हें विश्व सर्वव्यापी परमेश्वर आपल्या मायेच्या योगानें कसें उत्पन्न करतो आणि पुढें मग त्याचें रक्षण आणि संहारहि कसा करतो, हें सर्व पुनः एकदां समजून घेण्याची माझी इच्छा आहे ॥ ६ ॥

तसेंच अनंतशक्तीचा तो श्रेष्ठ परमेश्वर, ज्या ज्या शक्तींचा स्वीकार करून खेळत खेळत आणि निर्माण केलेल्या आपल्याच रूपांना खेळवीत खेळवीत सृष्टि उत्पन्न करतो आणि तिचा पुढें विस्तार करतो, त्यांचेंहि ज्ञान करून घ्यावें अशी माझी इच्छा आहे ॥ ७ ॥

हे शुकाचार्य हो, अद्भुत पराक्रम करणाऱ्या त्या श्रीकृष्णाच्या लीला खरोखरच मोठमोठ्या विद्वानांना देखील आकलन करण्यास अत्यंत कठीण आहेत असें वाटतें ॥ ८ ॥

परमेश्वर एकटा असून नाना प्रकारचे जन्म घेतो आणि विविध लीला करतो, त्यासाठीं त्याला जे मायेचे गुण स्वीकारावे लागतात ते तो क्रमाक्रमानें एक एक स्वीकारतो,

कीं सर्व एकाच वेळीं घेतो, हें मला समजून घ्यावयाचें आहे. तुम्हीं तें मला सांगावें. कारण तुम्हांला वेदरूपी शब्दब्रह्म[1] आणि सच्चिदानंदरूपी परब्रह्म या दोहोंचेंहि उत्तम ज्ञान आहे ।। ९ ।। १० ।।

सूत म्हणतो, शौनक हो, याप्रमाणें परीक्षित् राजानें श्रीकृष्णाचे गुणानुवाद वर्णन करण्याविषयीं शुकाचार्यांना विनंती केली असतां, इंद्रियांचा स्वामी जो श्रीकृष्णपरमात्मा त्याचें स्मरण करून शुकाचार्यांनीं आपल्या भाषणास आरंभ केला ।। ११ ।।

शुकाचार्य म्हणतात,—या आभासमय विश्वाची उत्पत्ति, स्थिति आणि लय या लीला करण्यासाठीं ज्यानें रज, सत्व आणि तम या गुणांच्या योगानें सर्व प्राण्यांच्या अंतर्यामीं वास करतो आणि ज्याची गति कोणालाहि आकलन करतां येत नाहीं, त्या माहात्म्यशाली श्रेष्ठ पुरुषोत्तमाला माझा नमस्कार असो ।। १२ ।।

तो साधूंच्या पापाचा नाश करतो व दुष्टांची उत्पत्ति होऊं देत नाहीं; त्याची मूर्ति म्हणजे संपूर्ण सत्त्वगुणाची मूसच आहे आणि जे पुरुष परमहंस[2] आश्रमांत स्थिर होतात, त्यांना आत्मज्ञान[3] देणाराहि पुनः तोच आहे. त्याला पुनः माझा नमस्कार असो ।। १३ ।।

परमेश्वरा, तूं भक्तांचा पालक आणि अभक्तांपासून अत्यंत दूर राहणारा आहेस. तुला माझा वारंवार नमस्कार असो ! तुझ्या ऐश्वर्याचें साम्यहि कोणाला यावयाचें नाहीं, मग त्याहून वरचढपणा कोण करणार ? तुझें वास्तव्यस्थान ब्रह्म असून त्यामध्यें तूं रममाण होतोस. तुला माझा नमस्कार असो ।।१४।।

ज्याच्या गुणांचें कीर्तन, ज्याच्या लीलांचें स्मरण, ज्याच्या मूर्तीचें दर्शन, तसेंच ज्याच्या चरणांचें वंदन, ज्याच्या कीर्तीचें श्रवण आणि ज्याचें पूजन केल्यानें प्राणिमात्राचें पातक तत्क्षणीं नष्ट होतें, त्या अत्यंत शुभकीर्तीच्या श्रीकृष्णाला माझा वारंवार नमस्कार असो ।। १५ ।।

ज्ञानी पुरुष ज्याच्या चरणांचा आश्रय केल्यानें इह आणि पर अशा दोन्ही लोकांवरील आपल्या मनाची आसक्ति टाकून देतात आणि जन्ममरणाच्या श्रमांतून मुक्त होऊन खरोखर मोक्षमार्गाला लागतात, त्या शुभकीर्तीच्या भगवंताला माझा नित्य नमस्कार असो ।। १६ ।।

ज्याला आपापलीं कर्में अर्पण केल्यावांचून, मोठे कीर्तिमान तपस्वी, दानशील पुरुष, योगीजन, मंत्रवेत्ते, सदाचरणी लोक इत्यादि कोणीहि आपलें हित करूं शकत नाहींत, त्या पुण्यकीर्ति परमेश्वराला माझा नित्य नमस्कार असो ! ।। १७ ।।

---

१ शब्दब्रह्म म्हणजे शब्दज्ञानानेंच वर्णिलेलें. ‘ ज्ञानं ब्रह्मेति ’ हें वाक्य प्रसिद्ध आहे. परं ब्रह्म म्हणजे ‘ विज्ञानं ब्रह्मेति व्यजानात् ’ अशी श्रुति आहे.

२ परमेश्वराशीं ऐक्यत्व पोंचलेले जे जीवन्मुक्त साधु, त्यांना परमहंस म्हणतात. नारद, पराशर, शुक व वसिष्ठ एवढ्यानांच परमहंस म्हणतात.

३ अनुमृग्य—अनु म्हणजे पुनःपुनः आणि मृग्य म्हणजे शोधून काढण्यास योग्य असें जें तें अनुमृग्य म्हणजे आत्मज्ञान.

भिल्ल, हूण, तैलंग, पुलिंग, चांडाळ, आभीर, कंक, यवन, खस इत्यादि अमंगल आचरणाचे लोकहि ज्या परमेश्वराच्या भक्तांचा आश्रय केल्यानें शुद्ध होतात, त्या पराक्रमशाली भगवंताला माझा नमस्कार असो ! ॥ १८ ॥

आत्मज्ञानी पुरुषांच्या अंतर्यामी वास करणारा, असा तो हा सर्वैश्वर्यसंपन्न परमेश्वर आहे. तिन्ही वेद, धर्म आणि तप हीं त्याचींच रूपें होत. ब्रह्मदेव, शंकर आदिकरून देव निष्पाप होऊनहि ज्याच्या स्वरूपाविषयीं विविध तर्कच करीत असतात, असा तो भगवान् माझ्यावर प्रसन्न होवो ! ॥ १९ ॥

लक्ष्मीचा पति, यज्ञांचा भोक्ता, लोकांचा रक्षण करणारा, बुद्धीचा चालक, त्रैलोक्याचा स्वामी, पृथ्वीचा अधिपति, तसाच अन्धक, वृष्णि व सात्वत् इत्यादि यदुकुलांचा नायक आणि मुख्य आधार, असा तो साधूंचा कैवारी भगवान् माझ्यावर प्रसन्न होवो ! ॥ २० ॥

ज्याच्या चरणांचें नित्य ध्यान करून समाधीच्या योगें शुद्ध केलेल्या बुद्धीनें ज्ञानी लोक आत्मतत्त्वाचा अनुभव घेतात आणि ऋषि आपापल्या रुचीप्रमाणें नांवें देऊन ज्याचें वर्णन करतात, तो मुक्तिदाता भगवान् श्रीकृष्ण मजवर प्रसन्न होवो ! ॥ २१ ॥

पूर्वीं ब्रह्मदेवाच्या हृदयांत सृष्टिरचनेची उत्तम[1] कल्पना ज्यानें उत्पन्न केली आणि त्या वेळीं ज्याच्या प्रेमामुळें उत्तम लक्षणांनीं युक्त * अशी वेदरूपी वाणी ब्रह्मदेवाच्या मुखांतून प्रकट झाली, तो ऋषींचा पुरस्कर्ता परमेश्वर मजवर प्रसन्न होवो ! ॥ २२ ॥

पंचमहाभूतांच्या योगानें हीं शरीरें निर्माण करून सोळा[2] गुणांचा उपभोग सोळा [3]कलांनीं युक्त होऊन जो घेतो आणि त्या शरीरांत वास करतो, तो सर्वव्यापी भगवान् माझ्या भाषणाला अलंकृत करो ! ॥ २३ ॥

ज्याच्या मुखकमलांतून स्रवणाऱ्या भागवतरूपी ज्ञानरसाचें भगवद्भक्त शांत चित्त होऊन पान करतात, त्या अत्यंत तेजस्वी अशा भगवान् व्यासाला मी नमस्कार करतों ॥ २४ ॥

शुकाचार्य म्हणतात, हे परीक्षित्‌राजा, ( मीं जें तुला आतां सांगणार ) हेंच पूर्वीं श्रीहरीनें ब्रह्मदेवाला सांगितलें होतें आणि नारदानें विचारल्यावरून, ज्यानें आपल्या उदरांत वेद सांठविले आहेत, अशा ब्रह्मदेवानें नारदाला तेंच प्रत्यक्ष सांगितलें ॥ २५ ॥

---

१. स्कं. २, अ. २ श्लो. २. पाहा. *स्पष्ट उच्चार, योग्य स्वर इत्यादि शुद्ध वाणीचीं लक्षणें शिक्षादि ग्रंथांत सांगितलेलीं आहेत.

२. ज्ञानेंद्रियांचे पांच विषय, कर्मेंद्रियांचीं पांच कार्यें, पंचप्राणांच्या पांच वृत्ति आणि मनाचा संकल्पविकल्परूप व्यापार हे सोळा गुण.

३. ज्ञानेंद्रियें, कर्मेंद्रियें, प्राण आणि मन या सोळा कला आणि सतरावी आत्मरूप जीवनकला.

**चौथा अध्याय समाप्त**

# अध्याय ५ वा

नारद म्हणाला—हे ब्रह्मदेवा, तूं सृष्टि उत्पन्न केलेली असल्यामुळें सर्वांच्या आधीं जन्मलेला तूंच आहेस. तुला मी नमस्कार करितों. आत्मतत्त्वाचें स्पष्टीकरण जेणेंकरून होईल असें कांहीं ज्ञान तूं मला सांग ॥ १ ॥

हे समर्थ अशा ब्रह्मदेवा, हें विश्व कोणीं उत्पन्न केलें, त्याचें स्वरूप काय आहे, तें कोणाच्या आधारानें राहतें व कोणांत लय पावतें, तसेंच तें कशा तऱ्हेचें आहे, हें सारें ज्ञान यथार्थ रीतीनें तूं मला सांग ॥ २ ॥

तुम्ही भूत, भविष्य आणि वर्तमान या तिन्ही काळांवर खरोखर सत्ता चालविणारे आहां व मीं विचारलेल्या प्रश्नांचीं सर्व उत्तरें आपणांस ठाऊक आहेत. कारण तळहातावर असलेल्या आवळ्याप्रमाणें सारें विश्व संपूर्णपणें तुम्ही जाणत आहां ॥ ३ ॥

तुम्ही स्वतः एकटेच प्रकृतीच्या साहाय्यानें पंचमहाभूतांपासून विविध असून सृष्टि उत्पन्न करतां; पण त्याचें ज्ञान तुम्हीं कोणापासून मिळविलें ? तुम्हांला आधार कोणाचा ? कोणाच्या सत्तेनें तुम्ही हें करतां आणि तुमच्याहि स्वरूपाला आधार कोणाचा ? ॥ ४ ॥

पोटांतून तंतु काढणाऱ्या कोळ्याप्रमाणें तुम्हीं स्वतःच्या सामर्थ्याला एकवटून स्वतःला श्रम होऊं न देतां आणि स्वतः निष्प्रतिबंध राहून या सर्व प्राणिमात्रांचें आत्मस्वरूपानें रक्षण करितां ॥ ५ ॥

हे विभो, या विश्वांत तुझ्याहून निराळ्या स्वरूपाचें आणि नाम, रूप व गुण यांनीं ओळखूं[1] येणारें, तुझ्याहून श्रेष्ठ किंवा कनिष्ठ किंवा तुझ्या बरोबरीचें, तसेंच चांगलें किंवा वाईट असें मला कांहींच दिसत नाहीं ॥ ६ ॥

( तुम्हींच सर्व विश्व उत्पन्न केलें आहे; पण असें असतांहि ) तुम्हीं एकाग्रचित्तानें दुर्घट असें जें तपश्चरण केलेंत, त्यामुळें आम्हांला हुरहुर वाटते आणि अशी शंका उत्पन्न होते कीं, तुमच्याहूनहि श्रेष्ठ असा दुसरा कोणी आहे कीं काय ? ॥ ७ ॥

यास्तव, हे सर्वाधिपते ब्रह्मदेवा, तुम्हीं सर्व जाणत असल्यामुळें मीं जें तुम्हांला विचारितों आहें, तें सर्व मला उत्तम रीतीनें समजेल अशाच पद्धतीनें तुम्ही मला सांगा ॥ ८ ॥

---

१ नांव, रूप आणि गुण यांमुळेंच वस्तु परस्परांपासून भिन्न अशा ओळखूं येतात. घर, दुमजली, हिरव्या रंगाचें, अशा वर्णनानें त्याची ओळख पटते. सृष्टींतून नाम, रूप आणि गुण काढून टाकल्यास एक अव्याकृत ब्रह्मच राहतें. हाच अर्थ ' विकारो नामधेयं, सुवर्णमित्येव सत्यम् ' इत्यादि उपनिषद्वाक्यांत दर्शविला आहे.

ब्रह्मदेव म्हणाला—वत्सा नारदा, तूं लोकांवर करुणा करणारा असल्यामुळें, तुला हा जो संशय आला तो चांगला आहे. कारण, हे शांतमूर्ते, या तुझ्या प्रश्नामुळेंच सर्वश्रेष्ठ अशा परमेश्वराच्या गुणानुवादाला मीं प्रवृत्त झालों ॥ ९ ॥

नारदा, तूं जें मला विचारलेंस, तें देखील कांहीं खोटें नाहीं. कारण माझा जो एवढा मोठा प्रभाव तुला वाटतो, तो माझ्याहून श्रेष्ठ दुसरा कोणी आहे, याचें ज्ञान तुला नसल्यामुळेंच वाटतो ॥ १० ॥

सूर्य, अग्नि किंवा नक्षत्रें, ग्रह आणि तारा हीं जशीं भगवंताच्या तेजानें प्रकाशित झालेल्या वस्तूंसच प्रकाशित करतात, त्याप्रमाणें मीं देखील त्या परमेश्वराच्या तेजानें प्रकाशित झालेल्या विश्वालाच प्रकाशित करतों. ( सृष्टि उत्पन्न करण्याचें माझें सामर्थ्य स्वतंत्र नाहीं. ) ॥ ११ ॥

त्या भगवान् वासुदेवाला नमस्कार असो ! आम्हीं त्याचेंच ध्यान करतों. त्याची माया सर्वथा अजिंक्य आहे. तिच्यामुळेंच लोक मला सृष्टि उत्पन्न करणारा असें म्हणतात ॥ १२ ॥

खरें म्हटलें, तर मायेला त्या परमेश्वराच्या दृष्टीसमोर उभें राहण्याचीहि अत्यंत लाज वाटते; पण तिनेंच मोह पाडिल्यामुळें आमच्यासारखे मंदबुद्धीचे पुरुष ' हें माझें, मी ' अशी अहंकाराची वल्गना करीत असतात ॥ १३ ॥

हे ब्रह्मपुत्र नारदा, महाभूतें, पूर्वजन्मांतील कर्में, त्यांच्या परिपाकाचा काळ, परिणाम करण्याचा त्याचा धर्म आणि विषयांचा भोक्ता जीव यांपैकीं कोणताहि पदार्थ, खरें पाहिलें तर, परमेश्वराहून श्रेष्ठ किंबहुना त्याच्याहून निराळा असा नाहींच ॥ १४ ॥

सारे वेद *नारायणस्वरूपीच होत. तसेंच देवहि नारायणाच्या शरिरापासूनच उत्पन्न झाले. हें त्रैलोक्य त्याच्यावरच अवलंबून आहे आणि यज्ञ देखील नारायणाच्या प्रातीसाठींच होत ॥ १५ ॥

अष्टांगादि योग नारायणाकरितांच करावयाचे आणि तपश्चर्याहि नारायणप्राती-साठींच आहे. ज्ञानाला सर्वस्वीं आधार नारायणाचाच आणि प्राणिमात्रांचें अंतिम आश्रय-स्थान नारायणच होय ॥ १६ ॥

नारदा, मला त्यानेंच निर्माण केलें आणि त्याच्या दृष्टिक्षेपानेंच स्फूर्ति उत्पन्न होऊन मी उत्पन्न करण्यास योग्य अशी सृष्टि निर्माण करतों. तो परमेश्वर सर्वांचा अंतर्यामीं असून स्वतः विकाररहित आणि सर्वांना साक्षीरूपानें पाहाणारा आहे ॥ १७ ॥

---

*प्रथम स्कंधांत अ. २ श्लोक २८,२९ " वासुदेवपरा वेदाः " अशा रीतीनें नारायण शब्दाच्या ऐवजीं वासुदेव शब्द घालून दोन श्लोक दिले आहेत. येथें तसेच पण वासुदेवाच्या ऐवजीं नारायण शब्द घालून दोन श्लोक बनवले आहेत. अर्थामध्यें भेद नाहीं. नारायण शब्दाचा अर्थशास्त्रांत " **आपो नारा इति प्रोक्ता आपो वै नरसूनवः ॥ ता यदस्यायनं पूर्वं तेन नारायणः स्मृतः** ॥ " ह्याचा अर्थ नार म्हणजे पाणी व त्यांत राहणारा तो नारायण, असा आहे.

तो सर्वव्यापी परमेश्वर स्वतः गुणांपासून अलिप्त आहे; पण त्यानें सृष्टीची उत्पत्ति, रक्षण आणि लय करण्यासाठीं, सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांचा मायेनें स्वीकार केला आहे ॥ १८ ॥

हे सत्त्वादि गुणच महाभूतें, ज्ञानस्वरूपी देवता आणि क्रियांचीं साधनें जीं इंद्रियें, त्यांच्या उत्पत्तीला कारण होत. पुरुष वस्तुतः त्यांपासून नित्य अलग असतो; परंतु त्यानें मायेचा आश्रय केला कीं, ते गुण त्याला कार्य, कारण आणि कर्ता यासंबंधानें बांधून[1] टाकतात ॥ १९ ॥

हे ब्रह्मज्ञ नारदा, ज्याचें स्वरूप इंद्रियांनीं कळण्यासारखें नाहीं, असा हा सर्वैश्वर्य-संपन्न परमेश्वर, या तीन[2] चिन्हांनीं आपल्या भक्तांना अनुमानानें ओळखितां येतो. सर्व चराचर विश्वाचा आणि माझाहि सत्ताधारी तोच होय ॥ २० ॥

नारदा, परमेश्वर मायेचा स्वामी आहे; पण त्या मायेच्या योगानें अनेकरूप होण्याची जेव्हां त्याला इच्छा होते, तेव्हां त्या परमात्म्यामध्यें काळ, कर्म आणि स्वभाव हीं सहजगत्याच येतात आणि मग परमेश्वर त्यांचा स्वीकार करतो ॥ २१ ॥

काळ[3], स्वभाव आणि कर्म यांचा स्वीकार करून ईश्वर त्यांचा आश्रयभूत झाला म्हणजे त्या काळापासून सत्त्व, रज आणि तम या गुणांचें न्यूनाधिक प्रमाणानें मिश्रण होतें. स्वभावापासून त्या गुणमिश्रणांचा विकास होतो आणि कर्मापासून महत्तत्त्वाचा उद्भव होतो ॥ २२ ॥

रजोगुण आणि तमोगुण यांनीं वृद्धि पावलेल्या महत्तत्त्वापासून विकाररूपानें ज्याला अहंकार म्हणतात तो उत्पन्न झाला. महाभूतें, ज्ञानस्वरूप देवता आणि क्रियांचीं साधनें इंद्रियें, हीं त्या अहंकाराचें स्वरूप असून त्यांत तमोगुणाचें प्राधान्य असतें. हा अहंकार पुढें आणखी विकार पावून तीन प्रकारचा होतो[4] ॥ २३ ॥

---

१ कार्यकारणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते ॥ पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते ॥ असें गीतेंत ( अ. १३, श्लो. २० ) सांगितलें आहे.

२ तीन गुण हींच तीं चिन्हें होत. गुण जड असल्यामुळें त्यांच्याकडून सृष्टीची उत्पत्ति व्हावयास त्यांच्यामागें कोणी प्रेरक पाहिजे, तोच परमेश्वर, असें अनुमान भक्त करतात.

३ काळ, कर्म आणि स्वभाव यांचा अर्थ १४ व्या श्लोकांत आलेला आहे.

४ " **प्रकृतेर्महांस्ततोऽहङ्कारस्माद्गणश्च षोडशकः । तस्मादपि षोडशकात्पञ्चभ्यः पञ्च भूतानि** ॥ ईश्वरकृष्णकृत सांख्यकारिका. प्रकृतीपासून महत्तत्व, महत्तत्वापासून अहंकार, अहंकारापासून अकरा इंद्रियें व पांच विषय व पांच विषयांपासून पांच महाभूतें, असा चोवीस तत्त्वांचा सांख्यशास्त्रांतील क्रम आहे.

ते तीन प्रकार म्हणजे सात्त्विक, राजस आणि तामस हे होत. नारदा, या तीन प्रकारच्या शक्तींत ज्ञानशक्ति म्हणजे देवता उत्पन्न करण्याची शक्ति, क्रियाशक्ति म्हणजे इंद्रियें उत्पन्न करण्याची शक्ति आणि द्रव्यशक्ति म्हणजे महाभूतें उत्पन्न करण्याची शक्ति, अशा शक्ति[1] अनुक्रमें असतात ॥ २४ ॥

पंचमहाभूतें उत्पन्न करणारा जो तामस अहंकार, त्यांत विकार होऊन आकाश उत्पन्न झालें. हा शब्द हा त्याचें सूक्ष्मरूप आणि गुण असून, द्रष्टा म्हणजे पाहणारा, आणि दृश्य म्हणजे दर्शनाचा विषय, यांचें ज्ञान होण्याची खूणहि[2] तोच होय ॥ २५ ॥

पुढें आकाशांत विकार होऊन वायु उत्पन्न झाला. वायूचा गुण स्पर्श हा आहे; पण वायूचा संबंध वरच्या आकाशाशीं असल्यामुळें त्या आकाशाचा गुण जो शब्द, तो वायूंतहि येतो. तो वायु प्राणरूपानें शरीरधारण, ओजरूपानें इंद्रियपोषण, सहोरूपानें मनाची पुष्टि आणि बलरूपानें शरीरसामर्थ्य उत्पन्न करणारा आहे ॥ २६ ॥

त्याच कारणास्तव, म्हणजे काल, कर्म आणि स्वभाव यांच्यामुळें वायूंत विकार होऊन त्यापासून, ज्याचा गुण रूप[3] आहे, असें तेज उत्पन्न होतें आणि तेजाचा संबंध आकाश व वायु यांशीं असल्यामुळें त्यांचे शब्द आणि स्पर्श, हे गुण तेजांतहि येतात ॥ २७ ॥

तेजामध्यें विकार होऊन त्यापासून आणखी रस[4]गुणानें युक्त असें जलतत्त्व उत्पन्न होतें आणि आकाश, वायु व तेज यांच्या संबंधामुळें, शब्द, स्पर्श आणि रूप हे त्यांचे गुणहि जलांत उतरतात ॥ २८ ॥

जलांत विकार होऊं लागला म्हणजे त्यापासून गंधनामक गुणानें युक्त असें पृथ्वीतत्त्व उत्पन्न होतें आणि आकाशादि तत्त्वांच्या संबंधावरून त्यांचे शब्द, स्पर्श, रूप आणि रस हेहि गुण[5] त्यांत येतात. (अशी ही तामस अहंकारापासून पंचमहाभूतात्मक सृष्टि उत्पन्न होते) ॥ २९ ॥

---

१ **सत्त्वात्संजायते ज्ञानं रजसो लोभ एव च ॥ प्रमादमोहौ तमसो भवतोऽज्ञानमेव च ॥ गीता** (अ. १४, श्लो. १७).

२ शब्द ऐकूं आला म्हणजे ज्याविषयीं तो आहे ती वस्तु आणि तिला पाहणारा पुरुष, या दोहोंचेंहि ज्ञान होतें.

३ रूप म्हणजे वर्ण, रंग.

४ रस म्हणजे रुचि, चव.

५ कारणाचे गुण तर कार्यांत उतरतातच; पण विकारामुळें कार्यांत उत्तरोत्तर अधिक गुणांची भर पडत जाते. यामुळें आकाशाचा शब्द हाच गुण आहे; पण वायूंत शब्द आणि स्पर्श, तेजांत शब्द, स्पर्श आणि रूप इत्यादि उत्तरोत्तर गुणांची वाढ होत गेली.

सात्त्विक अहंकारापासून मन उत्पन्न होतें. दिशा, वायु, सूर्य, वरुण, अश्विनी-कुमार, तसेंच अग्नि, इंद्र, उपेन्द्र, मित्र आणि ब्रह्मदेव या * दहा देवताहि सात्त्विक अहंकारापासूनच होतात ॥ ३० ॥

राजस अहंकारांत विकार होऊं लागून त्यापासून पांच ज्ञानेंद्रियें व पांच कर्मेंद्रियें अशीं दहा इंद्रियें उत्पन्न झालीं. ज्ञानाचा आश्रय करून राहणारी शक्ति म्हणजे बुद्धि आणि क्रियेला आधारभूत असलेली शक्ति म्हणजे प्राण हीं राजस अहंकारापासून उत्पन्न झालेलीं आहेत. कान, त्वचा, नाक, डोळे, जिव्हा, वाणी, हात, शिश्न, पाय आणि गुद हीं तीं दहा इन्द्रियें होत ॥ ३१ ॥

हे ब्रह्मज्ञान्यांत श्रेष्ठ असलेल्या नारदा, जेव्हां पंच महाभूतें, दश इंद्रियें, मन आणि सत्त्व, रज व तम हे गुण एकत्र झालेले नव्हते व त्यामुळें त्यांना जेव्हां शरीर निर्माण करण्याचें सामर्थ्य नव्हतें, तेव्हां भगवंताच्या शक्तीनें त्यांना प्रेरणा केली. त्या वेळीं परस्परांशीं मिळूं लागून त्यांनीं विविध तत्त्वांचे कमीअधिक भाग घेतले आणि दोन प्रकारचें[1] हें विश्वात्मक शरीर निर्माण केलें ॥ ३२ ॥ ३३ ॥

नारदा, अशा रीतीनें उत्पन्न झालेलें तें विश्वाचें अंडरूप शरीर उदकामध्यें पडलेलें होतें. तेथें तें हजारों वर्षे पडून राहिल्यावर शेवटीं काळ, कर्म आणि स्वभाव, यांना अनुसरणाऱ्या जीवरूप परमात्म्यानें तें निर्जीव असलेलें अंड सजीव केलें ॥ ३४ ॥

मग तें अंड फोडून त्यांतून तोच हा पुरुष बाहेर आला. त्या पुरुषाला सहस्रावधि मांड्या, सहस्रावधि पाय, सहस्रावधि डोळे आणि तशींच तोंडें आणि मस्तकेंहि सहस्रावधि आहेत ॥ ३५ ॥

ह्या पुरुषाच्या शरिराच्या अवयवांत सर्व विश्वाची रचना आहे असें ज्ञानी लोक समजतात. त्याच्या कंबरेच्या पृष्ठभागादि अवयवांत खालच्या सात पाताळांची आणि उदराकडील भाग इत्यादि अवयवांत वरच्या सात लोकांची ते कल्पना करतात[2] ॥ ३६ ॥

ब्राह्मण हें त्या पुरुषाचें मुख होय आणि क्षत्रिय हे त्याचे बाहु होत. तसेंच वैश्य हे त्याच्या मांडीपासून उत्पन्न झालेले असून शूद्र पायांपासून झाले ॥ ३७ ॥

---

* कान, त्वचा, डोळे, जीभ, घ्राण हीं ज्ञानेंद्रियें आणि मुख, हात, पाय, गुद व शिश्न हीं कर्मेंद्रियें, यांच्या या देवता अनुक्रमें होत हीं इंद्रियें राजस-अहंकारापासून होतात; पण त्यांच्या देवता सात्त्विक होत. मनाची देवता चंद्र व स्वतः मन हीं मात्र सात्त्विकच होत.

१ पिंड आणि ब्रह्मांड म्हणजे व्यष्टि आणि समष्टि किंवा समूह असें द्विविध.

२ खालील सात भुवनें म्हणजे अतल, वितल, सुतल, तलातल, रसातल, महातल व पाताल व वरील सात म्हणजे भू, भुवः, स्वः, महः, जन, तप व सत्य हे सात लोक मिळून १४ भुवनें म्हणजे लोक होतात.

( या विराट्पुरुषाच्या शरिरांत सप्त पातालें व सप्त लोक कसे आहेत तें आतां पाहा.) त्याच्या पायांपासून पृथ्वीलोक झाला असून, नाभीपासून भुवर्लोक म्हणजे अंतरिक्ष झालें. त्या परमात्म्याच्या हृदयानें स्वर्गलोक सिद्ध झाला आणि वक्षःस्थलानें महर्लोक कल्पिला आहे ॥ ३८ ॥

त्याच्या कंठाच्या ठिकाणीं जनलोक कल्पितात आणि दोन* ओठांपासून तपोलोकाची कल्पना करतात. तसेंच त्याच्या मस्तकापासून सत्यलोक झाला असें समजून ब्रह्मलोक हा नित्य ( म्हणजे कोणापासून उत्पन्न न झालेला व म्हणून अनित्य अशा चौदा भुवनांहून निराळा ) मानितात ॥ ३९ ॥

त्याच्या कटिभागाच्या ठिकाणीं अतल, त्याच्या मांड्यांच्या स्थानीं वितल, गुडघ्यांमध्यें सुतल, तसेंच पोटऱ्यांमध्यें तलातल आहे अशी कल्पना ( ज्ञात्यांनीं केलेली ) आहे ॥ ४० ॥

त्याच्या घोट्यांनीं महातलाची, पायाच्या चवड्यांनीं रसातळाची आणि पायाच्या तळव्यांनीं पातालाची कल्पना केलेली आहे. अशा रीतीनें हा विराट्पुरुष ह्या चौदा लोकांच्या रूपानें राहिलेला आहे ॥ ४१ ॥

ह्या विराट्पुरुषाच्या शरिरावर लोकरचनेची दुसरीहि एक कल्पना बसवितात. ती अशी कीं, भूलोक म्हणजे त्याचे पाय, भुवर्लोक म्हणजे त्याची नाभि; आणि स्वर्गलोक म्हणजे त्याचें मस्तक असें मानितात ॥ ४२ ॥

---

* स्तनद्द्वयात् असा पाठ घेऊन स्तनत् म्हणजे शब्द करणारे ओठ असा अर्थ करणें बरें. स्तन म्हणजे ओठ नव्हेत आणि यथोक्त क्रमानें खालून वर येतांना गळ्याच्या वरती ओंठच येतात.

**पांचवा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ६ वा

ब्रह्मदेव म्हणाला — हे नारदा, त्या विराट्पुरुषाचें मुख हें वाणी आणि तिची देवता अग्नि याचें स्थान होय, तसेंच सप्त[1] धातु हें छंदांचें[2] आणि जिव्हा हें हव्यें[3], कव्यें[4], अमृतान्नें[5] आणि सर्व प्रकारचे रस[6] यांचें स्थान होय ॥ १ ॥

त्या विराट्पुरुषाच्या दोन नाकपुड्या म्हणजे सगळ्या प्राणांचीं आणि वायूचीं उत्पत्तिस्थानें होत. तसेंच घ्राणेंद्रियें[7] हें अश्विनीकुमार, ओषधि आणि सामान्य व विशेष असे गंध यांचें विशिष्ट स्थान होय ॥ २ ॥

विराट्पुरुषाचें चक्षुरिंद्रिय, हें रूप आणि तेज यांचें स्थान होय. आणि स्वर्ग आणि सूर्य यांचें स्थान त्यांचे नेत्रगोलक होत. त्याचे कर्ण हे दिशा आणि तीर्थें यांचें उद्गमस्थान असून श्रोत्रेन्द्रिय हें आकाश आणि शब्द यांचें उत्पत्तिस्थान होय. त्याचें शरीर हें वस्तूंतील तत्त्वांचें व त्याच्या सौंदर्याचें स्थान असून त्याची त्वचा, स्पर्श आणि वायु, तसेच सर्व प्रकारचे यज्ञयाग, यांचें स्थान होय ॥ ३ ॥ ४ ॥

त्या विराट्पुरुषाचे केश हे उद्भिज्ज जातीचे म्हणजे वृक्षादिकांचें उत्पत्तिस्थान होय. या उद्भिज्जामुळेंच यज्ञाचें साहित्य मिळून तो सिद्ध होतो. विराट्पुरुषाचे केश, श्मश्रु आणि नखें हीं अनुक्रमें मेघ, विद्युल्लता आणि लोखंड इत्यादिकांचीं उत्पत्तिस्थानें आहेत. त्याचे बाहु हे इंद्रादि आठ दिग्पालांचें, तसेंच इतर अंशतः लोकपालन करणाऱ्या

---

१ "**रसाद्रक्तं ततो मांसं मांसान्मेदः प्रजायते ॥ मेदसोऽस्थि ततो मज्जा मज्जः शुक्रस्य संभवः ॥**" ( सुश्रुत ). रस, रक्त, मांस, मेद, अस्थि, मज्जा व शुक्र हे सात धातु.

२ "**गायत्र्युष्णिगनुष्टुप् च बृहती पंक्तिरेवच ॥ त्रिष्टुप् च जगती चैव॥**" ( वृत्तरत्नाकर ). गायत्री, उष्णिक्, अनुष्टुप्, बृहती, पंक्ति, त्रिष्टुप् आणि जगती हे सात वैदिक छंद होत.

३ इंद्रादि देवांना उद्देशून दिलेलें जें हवनीय अन्न त्याला हव्य म्हणतात.

४ पितरांना उद्देशून दिलेल्या अन्नाला कव्य म्हणतात.

५ यज्ञ करून उरलेल्या अन्नाला अमृतान्न म्हणतात.

६ "**मधुराम्लकटुतिक्तक्षारकषायाः षड्रसाः**" ( चरकसंहिता ) गोड, आंबट, तिखट, कडु, खारट व तुरट असे सहा रस होत.

७ नाकपुड्या व वास जाणणारें घ्राणेंद्रिय हीं भिन्न होत. नाकपुड्या असून वास समजत नाहीं, असें होतें. हाच नियम इतर इंद्रियांनाहि लागू आहे.

देवतांचेंहि स्थान होत. त्याच्या पावलांचें क्षेत्र तें पृथ्वी, अंतरिक्ष आणि स्वर्ग यांचें स्थान असून त्यामुळें प्राणिमात्रांचें रक्षण होऊन त्यांना आश्रय मिळतो. तसेंच त्या श्रीहरीचे चरण हे सर्व इच्छा पुरविणाऱ्या अशा वरांचें स्थान होय ॥ ५ ॥ ६ ॥

त्या पुरुषाच्या जननेंद्रियाचें मूळ हें उदक, रेत, उत्पत्ति, पर्जन्य आणि प्रजापति यांचें उत्पत्तिस्थान असून, जननेंद्रिय हें प्रजोत्पादनाच्या आनंदापासून होणाऱ्या समाधानाचें अधिष्ठान होय. तसेंच हे नारदा, त्याच्या गुह्येंद्रियाचें मूळ हें यम व मित्र यांचें उत्पत्तिस्थान असून गुह्येंद्रिय हें मलत्याग, हिंसा, दारिद्र्य, मृत्यु आणि नरक यांचें स्थान होय ॥ ७ ॥ ८ ॥

विराट्पुरुषाची पाठ म्हणजे पराजय, अधर्म आणि अज्ञान यांचें उत्पत्तिस्थान असून त्याच्या नाड्यांपासून नद आणि नद्या, तसेंच त्याच्या अस्थींच्या समुदायापासून पर्वत उत्पन्न झाले. त्या पुरुषाचें पोट हें अव्यक्त अशी माया किंवा प्रकृति, सहा रस आणि समुद्र यांचें, तसेंच प्राणिमात्र आणि मृत्यु यांचें स्थान समजतात आणि त्याचें हृदय हें सर्वांच्या मनाचें अधिष्ठान म्हटलें आहे ॥ ९ ॥ १० ॥

हे नारदा ! धर्म, मीं ब्रह्मदेव, तूं नारद, सनत्कुमार, शंकर, विज्ञान आणि श्रेष्ठ असा सत्त्वगुण या सर्वांचें श्रेष्ठ स्थान म्हणजे त्या पुरुषाचें चित्त होय ॥ ११ ॥

हे नारदा, मीं, तूं शंकर, तसेंच तुझ्या पूर्वीं जन्मलेले ऋषि, हे देव, दानव, मनुष्य आणि हत्ती, ~~पक्षी~~, हरिण, क्षुद्र सर्प, गन्धर्व, अप्सरा, यक्ष, राक्षस, पिशाचगण, मोठे सर्प, पशु, पितर, सिद्धनामक देव, देवांचे भाट, वृक्ष, तसेंच नाना प्रकारचे जलचर, स्थलचर आणि आकाशचर जीव, त्याप्रमाणेंच शनि, गुरु इत्यादि ग्रह, नक्षत्रें, धूमकेतु, तारका, विजा, मेघ इत्यादि, हें सर्व म्हणजे पूर्वीं होऊन गेलेलें, पुढें होणारें आणि जें आज विद्यमान आहे तें हा पुरुषच होय. त्यानें हें सर्व विश्व व्यापून टाकिलें असून तो त्याच्याबाहेर आणखी वीतभर राहिलाच आहे * ॥ १२ ॥ १३ ॥ १४ ॥ १५ ॥

हा सूर्य ज्याप्रमाणें आपल्या स्वतःच्या स्थानाला प्रकाशित करून बाहेरहि प्रकाश पाडितो, त्याप्रमाणें हा पुरुष आपल्या विराट्स्वरूपाला प्रकाशित करून आंत व बाहेर असा आणखीहि प्रकाश पाडितो ॥ १६ ॥

हे ब्रह्मवेत्त्या नारदा, तो पुरुष ज्या ठिकाणीं मृत्यु नाहीं आणि भय नाहीं, अशा त्या मोक्षस्थानाचा स्वामी आहे. विनाशी अशा अन्नादि उपभोगांपासून ( आणि मग अर्थात् त्यांच्या फलांपासून ) दूर राहिला असल्यामुळें त्या पुरुषाचें हें माहात्म्य वर्णनातीत झालें आहे ÷ ॥ १७ ॥

---

* 'पुरुष एवेदं सर्वं यद्भूतं यच्च भव्यं ॥' आणि 'स भूमिं विश्वतो वृत्वाऽत्यतिष्ठद्दशांगुलं ॥ या ऋग्वेदांतील विधानांचा या १५ व्या श्लोकांत अनुवाद आला आहे.

÷ हाच अर्थ उतामृतत्वस्येशानो यदन्नेनातिरोहति ॥' आणि 'एतावानस्य महिमाऽतो ज्यायांश्च पूरुषः ॥' या पुरुषसूक्तोक्त वचनांत आला आहे. जीवात्मा आणि

पृथ्वी आदिकरून लोक ज्याचे अवयव होत, त्या पुरुषाच्या पायांच्या ठिकाणीं सर्व प्राणिमात्र आहेत असें ज्ञानी म्हणतात. पृथ्वी, अंतरिक्ष आणि स्वर्ग या तीन लोकांचें मस्तक म्हणजे जो महर्लोक त्याच्याहि मस्तकावरील जन, तप आणि सत्य या तीन लोकांत मोक्ष, क्षेम आणि निर्भयता हीं ठेवलेलीं आहेत + ॥ १८ ॥

त्रैलोक्याच्या बाहेरचे जे जनादि लोक ते विराट्पुरुषाचे तीन पाय आहेत. ज्यांनीं संतति उत्पन्न करण्याचा मार्ग स्वीकारला नाहीं, त्या ब्रह्मचाऱ्यादिकांचीं ते लोक म्हणजे आश्रयस्थानें होत; पण लहान व्रतें आचरणारे जे गृहस्थाश्रमी पुरुष त्यांचें स्थान त्रैलोक्याच्या आंतच असतें * ॥ १९ ॥

त्रैलोक्याच्या आंत व त्याच्या बाहेर अशा सर्वत्र ठिकाणीं एकच जीव क्रमानें संचार करतो. कारण विषयोपभोगाचा म्हणजे साशन आणि वैराग्याचा म्हणजे अनशन असे हे दोन मार्ग आहेत व त्यांना अज्ञानरूप आणि ज्ञानरूप मार्ग असेंहि म्हणतात. त्यांपैकीं जीव प्रथम विषयोपभोगाचा आणि मग वैराग्याचा असे दोन्ही मार्ग क्रमानें आक्रमण करितो÷ ॥ २० ॥

महाभूतें, इंद्रियें आणि गुण यांनीं युक्त अशा विराट्पुरुषापासून हें ब्रह्मांड उत्पन्न झालें आणि सूर्य ज्याप्रमाणें आपल्या किरणांनीं स्वतःचें मंडल प्रकाशित करून बाहेरहि प्रकाशतो, त्याप्रमाणें तो पुरुष त्या पंचमहाभूतात्मक अशा साऱ्या विश्वाला व्यापून बाहेरहि राहिला आहे ॥ २१ ॥

नारदा, मीं त्या महापुरुषाच्या नाभिकमळापासून जेव्हां उत्पन्न झालों, तेव्हां याच्या अवयवावांचून दुसरी यज्ञसामग्री मला कांहींच दिसली नाहीं ॥ २२ ॥

---

परमात्मा यांमध्यें, एक विषयांत रमतो आणि दुसरा तटस्थ असतो, हाच महत्त्वाचा भेद असून तो आणखी 'द्वा सुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिषस्वजाते । तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्त्यनश्नन्नन्यो अभिचाकशीति या श्रुतींतहि सांगितला आहे.

+ 'पादोस्य विश्वा भूतानि त्रिपादस्यामृतं दिवि' या ऋग्वेदवचनाचा अर्थ वरील श्लोकांत आहे.

* ब्रह्मचर्य, वानप्रस्थ आणि संन्यास हीं व्रतें होत. तीं आचरणाराला त्रैलोक्याच्या वरचे अधिक सुखाचे लोक मिळतात. गृहस्थाश्रम कमी योग्यतेचा असें समजून त्याला त्रैलोक्यांतच स्थान सांगितलें आहे.

÷ गीतेच्या आठव्या अध्यायांत 'अग्निर्ज्योतिरहः शुक्लः षण्मासा उत्तरायणम्' आणि 'धूमो रात्रिस्तथा कृष्णः षण्मासा दक्षिणायनम्' [ श्लो. २४ व २५ ] हे जे ब्रह्मवेत्ते आणि योगी यांचे मार्ग क्रमानें सांगितले तेच हे होत. वेदांतहि त्यांना 'साशन' आणि 'अनशन' असेंच म्हटलें आहे. अशन म्हणजे खाणें, भोग; भोगांनीं सहित तो साशन आणि भोगांनीं रहित तो अनशन.

हे साधुश्रेष्ठा नारदा, ( मला त्या महापुरुषप्रीत्यर्थ यज्ञ करावासा वाटला; परंतु यज्ञाचें साहित्य कांहींच दिसेना. तेव्हां) यज्ञास लागणारी सामग्री, म्हणजे पशू, यज्ञस्तंभाचे वृक्ष आणि दर्भ, यज्ञ करण्याची भुमि, सर्व गुणयुक्त असा वसंतादि काल, पात्रें इत्यादि पदार्थ, धातूसारख्या ओषधि, घृतादि स्निग्ध द्रव्यें, मध इत्यादि सहा रस, लोखंड, मृत्तिका आणि ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, तसेंच होता, अध्वर्यु, उद्गाता आणि ब्रह्म या चार ऋत्विजांनीं साध्य होणारें कर्म, ज्योतिष्टोम इत्यादि नांवें, ऋगादि मंत्र, दक्षिणेसाठीं द्रव्य, यज्ञाचीं अंगभूत व्रतें, देवतांचा क्रम, यज्ञकर्माच्या पद्धति, यज्ञाचा संकल्प, कर्मानुष्ठानाचें ज्ञान, सूर्याच्या गति, देवतांचीं ध्यानें, दोषपरिमार्जनाचे प्रायश्चित्तविधि, सर्व कर्म अर्पण करण्याची बुद्धि आणि आणि दुसरेंहि अवश्य पदार्थ, ही यज्ञसामग्री त्याच्या अवयवांतच मीं सिद्ध केली ॥ २३॥२४॥२५॥२६॥

याप्रमाणें त्या पुरुषाच्या अवयवांनींच यज्ञाची सर्व सामग्री मीं सिद्ध केली आणि त्याच्याच योगानें त्या यज्ञपुरुषाची पूजा * केली ॥ २७॥

ब्रह्मदेव म्हणतात, हे नारदा, (मीं त्या यज्ञपुरुषाची पूजा केलेली पाहून ) नंतर या तुझ्या मरीचि आदिकरून नऊ प्रजापतिबंधूंनीं देखील शांतचित्तानें त्या परमेश्वराच्या सगुण आणि निर्गुण अशा दोन्ही स्वरूपांची तशीच पूजा केली ॥ २८॥

त्यानंतर कालान्तरानें स्वायंभुवप्रमुख चौदा मनु, दुसरे ऋषि, तसेच पितर, देव, दैत्य, मनुष्य इत्यादि सर्वांनीं सर्वव्यापी अशा त्या परमेश्वराचें यज्ञरूपानें पूजन केलें ॥ २९॥

नारदा, वास्तव हें सारें विश्व त्या भगवंताच्या ठिकाणींच राहिलें आहे. वस्तुतः तो परमेश्वर स्वतः निर्गुण आहे; परंतु सृष्टि उत्पन्न करण्याच्या वेळीं त्यानें प्रकृतीच्या योगानें ( सत्त्व, रज व तम या तीन ) मोठ्या गुणांचा स्वीकार केला ॥ ३०॥

त्या परमेश्वरानें आज्ञा केल्यामुळेंच मीं ही सृष्टि उत्पन्न करतों. त्याच्याच आधीन राहून शंकर हा सृष्टिसंहाराचें कार्य करितो आणि तो विराट्पुरुष तीन गुणरूपी शक्तींचा अवलंब करून विष्णुरूपानें या विश्वाचें पालन करितो ॥ ३१॥

ब्रह्मदेव म्हणतात, बा नारदा, तूं जें मला विचारिलेंस त्याचें ज्ञान मीं तुला याप्रमाणें सांगितलें. ( सारांश एवढाच कीं ) त्या परमेश्वराहून निराळें व्यक्त किंवा अव्यक्त असें दुसरें कांहीं देखील उत्पन्न होण्यासारखें नाहीं. ( सर्व विश्व केवळ परमेश्वराची मायाच होय ) ॥ ३२॥

नारदा, माझी वाणी कधींहि असत्य होत नाहीं अथवा माझ्या मनाची प्रवृत्ति असत्याच मार्गाकडे जात नाहीं. तसेंच माझीं इन्द्रियें सुद्धां दुष्ट मार्गाकडे वळत नाहींत.

* यापूर्वीच्या श्लोकांत पुरुषसूक्तांतील इतर वर्णन असून या श्लोकांत ' यज्ञेन यज्ञमयजन्त देवाः ' या शेवटच्या भागाचा अर्थ आला आहे.

याचें कारण म्हणशील तर एवढेंच कीं, मीं मोठ्या उत्कंठेनें हृदयांत श्रीहरीची स्थापना केली आहे ॥ ३३ ॥

अशा प्रकारचा हा मी वेदस्वरूप आहें आणि तपःस्वरूपहि आहें. प्रजापतींचा मी स्वामी असून ते मला वंदन करतात; पण मी कोणापासून उत्पन्न झालों याविषयीं कुशलतेनें एकाग्रचित्त होऊन योगाचा अभ्यास केला, तरी देखील, हें कांहीं मला जाणतां आलें नाहीं ॥ ३४ ॥

त्या परमेश्वराचे चरणीं मी नमस्कार करितों. शरणागतांचें संसारदुःख ते नष्ट करितात. ते कल्याणाचें धाम असून सर्व मंगलाचें स्थान आहेत. आकाशाला जसा स्वतःचाच अंत लागत नाहीं, तसा त्या परमेश्वराला सुद्धां स्वतःच्या मायेचा अंत लागलेला नाहीं, मग इतरांना तो कसा लागावा ? ॥ ३५ ॥

नारदा, त्या परमेश्वराचें वास्तविक स्वरूप मला कळत नाहीं. तुम्हांसारख्यांनाहि कळत नाहीं आणि वामदेवालाहि कळत नाहीं; मग इतर देवादिकांची कथा काय ? त्याच्याच मायेनें आपली बुद्धि मोहित झालेली असून त्यानें निर्माण केलेल्या या विश्वांतील गोष्टी तेवढ्या मात्र आपल्या सामर्थ्यानुरूप आपण जाणत आहोंत ॥ ३६ ॥

आमच्यासारखे पुरुष परमेश्वराच्या विविध अवतारांतील पराक्रमांचें गायन करतात; पण त्याचें वास्तविक स्वरूप त्यांना समजत नाहीं. त्या भगवंताला माझा नमस्कार असो ! ॥ ३७ ॥

तो हा आदिपुरुष स्वतः जन्मरहित असतांना प्रत्येक प्रत्येक कल्पांत नवी सृष्टि उत्पन्न करतो व आत्मस्वरूपानें आत्मस्वरूपांतच तिचें स्वतः रक्षण करितो आणि शेवटीं त्या आत्मस्वरूप सृष्टीचा स्वतःमध्येंच लय करितो ॥ ३८ ॥

ब्रह्मदेव म्हणतात, हे नारदा, त्या आदिपुरुषाचें स्वरूप अत्यंत शुद्ध, निर्विकार, ज्ञानस्वरूप, सर्वान्तर्यामी, सर्वत्र स्थिर असलेलें, सत्यस्वरूप, आदि-अंतरहित, पूर्ण स्वरूपाचें, गुणापासून अलिप्त, सनातन आणि एकटें एकच आहे. बुद्धि, इंद्रियें आणि अंतःकरण हीं शांत करून जेव्हां मननशील ऋषि त्याचें ध्यान करितात, तेव्हांच त्याचें ज्ञान त्यांना होतें; पण दुष्ट तर्कांनीं मन व्याप्त झालेलें असतां तें स्वरूप गुप्त होतें ॥ ३९ ॥ ४० ॥

सर्वव्यापी अशा त्या परमेश्वराचा पहिला अवतार म्हणजे हा आदिपुरुष होय. काळ, स्वभाव आणि सदसद्रूप म्हणजे कार्यकारणरूप अशी प्रकृति ( या त्या पुरुषाच्या शक्ति होत. ) मन, पंचमहाभूतें, अहंकार, सत्त्वादि गुण, दशेंद्रियें, समष्टिरूप विराट् देह आणि व्यष्टिरूप पिंडात्मक देह, तसेच सर्व अचल आणि चल पदार्थ, हेहि त्याचे ( कार्यरूप ) अवतार होत ॥ ४१ ॥

ब्रह्मदेव म्हणतात, नारदा, मीं स्वतः, शंकर, यज्ञभोक्ता विष्णु, हे दक्ष आदिकरून प्रजापति आणि तुझ्यासारखे देवर्षि, तसेच स्वर्गलोकादिकांचे पालनकर्ते इंद्रादिक, पक्षि-कुलाचे नायक गरुडादि, मनुष्यांतील राजे, पातालादि भुवनांचे स्वामी, मोठमोठे गंधर्व, विद्याधर व चारण, यक्ष, राक्षस, सर्प, नाग यांचे स्वामी, तसेच प्रमुख ऋषि आणि

पितर, दैत्यांचे, सिद्धांचे व दानवांचे राजे आणि दुसरे जे प्रेत, पिशाच, भूत, * कूष्मांड, जलचर प्राणी, पशु आणि पक्षी यांचे अधिपति; किंबहुना या जगांत जें जें म्हणून ऐश्वर्ययुक्त, तेजस्वी, ओजस्वी, सामर्थ्यवान्, क्षमाशील असेल; तसेंच सौंदर्य, नम्रता, संपत्ति, व बुद्धि हीं जेथें असतील अथवा वर्णानें जें अद्भुत असेल, तें तें सर्व—मग तें रूपवान् असो कीं रूपहीन असो,—ईश्वरस्वरूपच आहे असें समज + ॥ ४२ ॥ ४३ ॥ ४४ ॥

नारदमुने, त्या सर्वव्यापी परमेश्वरानें क्रीडेसाठीं घेतलेले जे कांहीं अवतार म्हणून मुख्यतः मानिलेले आहेत, त्यांच्या कथारसाचें पान करणारांच्या कर्णांचें ( दुष्टकथाश्रवणरूप ) पाप नष्ट होतें. त्या सुंदर कथा मीं तुला आतां क्रमाक्रमानें सांगतों ॥ ४५ ॥

---

* पिशाचांची एक जात.

+ हाच अर्थ भगवद्गीतेच्या ( अ. १०, श्लो. ४१ ), यद्यद्विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा । तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंऽशसंभवम् ॥ या श्लोकांत सांगितला आहे.

## सहावा अध्याय समाप्त

---

# अध्याय ७ वा

अनंतशक्तीच्या त्या भगवंतानें यज्ञस्वरूपी वराहाचें रूप घेतलें, तें हिरण्याक्ष दैत्यानें रसातळीं नेलेल्या पृथ्वीला वर काढण्यासाठीं होय. त्या वेळीं तो आदिदैत्य महासागराच्या तळीं गेला होता; पण तेथेंहि जाऊन त्या वराहरूपी ईश्वरानें, इन्द्र ज्याप्रमाणें पर्वताचे फोडून तुकडे करतो, त्याप्रमाणें त्या दैत्याला आपल्या दाढेनें फाडून त्याचे तुकडे केले ॥ १ ॥

त्यानंतर रुचि नांवाच्या ऋषीपासून आकूतीचा पुत्र म्हणून सुयज्ञ नांवानें ईश्वर अवतरला. त्या सुयज्ञानें दक्षिणानामक आपल्या पत्नीच्या ठिकाणीं सुयम नांवाचे देव निर्माण केले. त्यानें त्रैलोक्यांचीं मोठमोठीं दुःखें हरण केलीं, म्हणून स्वायंभुव* मनूनें त्याला 'हरि' असें नांव ठेविलें ॥ २ ॥

ब्रह्मदेव म्हणतात, हे नारदा, पुढें परमेश्वरानें कर्दमऋषीच्या घरीं देवहूतीचा पुत्र म्हणून अवतार घेतला. या वेळीं तो आणखी नऊ बहिणींसह अवतरला होता. त्यानें आपल्या मातेला आत्मज्ञानाचा मार्ग सांगितला, त्यायोगें त्या देवहूति मातेनें त्रिगुणांवरील आसक्तीमुळें आत्म्यावर आलेला मळ ह्या लोकींच धुऊन काढून कपिलाची मोक्षगति मिळविली ॥ ३ ॥

अत्रिऋषीला पुत्रप्राप्तीची इच्छा झाली, तेव्हां भगवंतानें संतुष्ट होऊन 'मीं स्वतःलाच तुजप्रत दिलें आहे' असें त्याला सांगितलें. त्यामुळें हा ईश्वराचा अवतार 'दत्त' नांवानें प्रसिद्ध झाला. त्याच्या चरणकमळाच्या धुळीनें यदु, हैहय इत्यादि राजांचे देह पवित्र झाले आणि त्यांना इहलोक आणि परलोक अशा दोन्ही ठिकाणचे भोग व ऐश्वर्य हीं प्राप्त झालीं ॥ ४ ॥

नारदा, प्रथम मीं निरनिराळे लोक उत्पन्न करण्याच्या इच्छेनें तपश्चर्या केली. त्या उग्र तपश्चर्येमुळें परमेश्वरानें चार 'सन' शब्द ज्याच्या नांवांत आहेत, असा सनकादि अवतार घेतला व पूर्वीच्या कल्पांत झालेल्या प्रलयांत जें आत्मज्ञान नष्ट झालें होतें, तें त्यानें पुनः सांगितलें. त्यामुळें मुनींना आपल्या अंतःकरणांत त्याचा अनुभव येऊं लागला ॥ ५ ॥

---

* स्वायंभुवमनूला आकुति, देवहूति व प्रसूति अशा तीन कन्या व प्रियव्रत आणि उत्तानपाद असे दोन पुत्र झाले. स्वायंभुवमनूनें रुचि नांवाच्या ऋषीबरोबर आकूतीचा विवाह लाविला व त्यापासून सुयज्ञ नांवाचा परमेश्वराचा अवतार झाला. भागवताच्या चौथ्या स्कंधांत पहिल्या अध्यायांत हें सर्व वर्णन आलें आहे.

दक्षकन्या जी मूर्ति, तिच्या ठिकाणीं धर्मनामक ऋषीपासून नर व नारायण असा अवतार झाला. तपश्चर्या हाच त्याचा श्रेष्ठ पराक्रम होता. भगवान् नारायणाच्या तपश्चर्येचा भंग करण्यासाठीं आलेल्या मदनाचें जणूं सैन्यच अशा अप्सरांनाहि त्याचा तपोभंग करतां आला नाहीं. कारण त्याच्या मांडीपासून उत्पन्न झालेली उर्वशी अप्सरा आपलें अगदीं प्रतिबिंबच आहे असें त्यांना आढळलें ( व हा त्याचा प्रभाव पाहून त्या खजील होऊन तेथून निघून गेल्या ) ॥ ६ ॥

अत्यंत कृतकृत्य असे जे पुरुष आहेत, ते क्रोधदृष्टीनें कामविकारांचा नाश करितात खरे; पण स्वतःला जाळणारा जो अनिवार राग, तो त्यांना नष्ट करतां येत नाहीं. ( तात्पर्य, कामापेक्षां क्रोध वरचढ आहे, ) तेव्हां हा क्रोधच ज्यांच्या अंतःकरणांत प्रवेश करावयाला फार भितो, त्यांच्या अंतःकरणाचा आश्रय कामविकाराला कसा करतां येईल ? ( नर-नारायणांनीं क्रोधहि जिंकिला असल्यामुळें कामाचें त्यांच्यापुढें कांहीं चाललें नाहीं ) ॥ ७ ॥

उत्तानपादराजाच्या समक्ष ध्रुवनामक पुत्राला त्याच्या सावत्र आईनें बाणासारख्या कठोर शब्दांनीं ताडन केलें. तेव्हां अल्पवयी असतांहि तो ध्रुव तपश्चर्या करण्यासाठीं वनांत निघून गेला आणि त्या परमेश्वराची स्तुति करूं लागला. ती स्तुति ऐकून प्रसन्न झालेल्या परमेश्वरानें त्या ध्रुवबालकाला अढळ पद दिलें. त्या पदाची योग्यता, त्या ध्रुवचक्राच्या वर आणि खालीं राहणारे सर्व दिव्य ऋषिगणहि वर्णन करितात ॥ ८ ॥

वेनराजा दुर्मार्गानें वर्तन करूं लागल्यामुळें, त्याला ऋषींनीं शाप देऊन त्याचा पराक्रम आणि ऐश्वर्य यांचा नाश केला. तेव्हां तो नरकांत पडूं लागला असतां परमेश्वरानें त्याचें रक्षण केलें आणि ऋषींच्या प्रार्थनेवरून स्वतः वेनाच्या पुत्ररूपानें अवतार घेऊन त्यानें पृथ्वीपासून सर्व प्रकारच्या वस्तु संपादन केल्या ॥ ९ ॥

नारदा, यानंतर परमेश्वरानें नाभिनामक राजाच्या सुदेवि नांवाच्या भार्येच्या ठिकाणीं ऋषभनामक पुत्राच्या रूपानें अवतार घेतला. हा ऋषभदेव सर्वत्र समदृष्टीनें पाहणारा, जितेंद्रिय, सर्वसंगापासून मुक्त आणि आत्मानंदांत मग्न होणारा असा होता. त्यानें वेड्या पुरुषासारखी वृत्ति ठेविली होती. त्या मुक्तसंग अशा स्थितीला ऋषि ' परमहंसाची स्थिति ' म्हणतात ॥ १० ॥

नारदा, माझ्या यज्ञांत त्या भगवान् यज्ञपुरुषानें हयग्रीव नांवाचा अवतार धारण केला. त्याची कांति सुवर्णासारखी असून, वेद आणि यज्ञ हेंच त्याचें स्वरूप होतें व सर्व देवतांमध्यें तो आत्मस्वरूपानें राहिला होता. हा हयग्रीव श्वासोच्छ्वास करीत असतां त्याच्या नाकांतून सुंदर अशी वेदवाणी प्रादुर्भूत झाली ॥ ११ ॥

युगाच्या शेवटीं ईश्वरानें मत्स्य अवतार घेतला. तो वैवस्वतमनूनें पाहिला होता. तो पृथ्वीरूप असल्यामुळें सर्व जीवमात्रांच्या समुदायाला त्याचा आश्रय होता. नारदा, माझ्या मुखांतून बाहेर पडलेले जे वेदमार्ग, ते ( त्या युगांताच्या प्रलयांत नष्ट होऊं लागले

असतां ) घेऊन त्या प्रलयकालाच्या अतिभयंकर उदकांत त्या मत्स्यानें यथेच्छ क्रीडा केली ॥ १२ ॥

देवांचे नायक आणि दानवांचे अधिपति यांनीं अमृत प्राप्त करून घेण्यासाठीं क्षीरसागराचें मंथन केलें. त्या वेळीं या आदिपुरुषानें कांसवाचें शरीर धारण करून मंदार-पर्वताला उचलून धरिलें. त्या आदिपुरुषाला ही मंथनाची वेळच निद्रा घेण्यास सुखाची वाटली. कारण मंदार पर्वताच्या भ्रमणानें त्याच्या पाठीचा कंडू नाहींसा झाला आणि त्यामुळें त्याला स्वस्थता आली ॥ १३ ॥

हे नारदा, भगवान् त्रैलोक्याचें सर्व संकट नाहींसें करणारा होय. त्यासाठींच त्यानें नंतर नृसिंहरूप धारण केलें, त्याच्या भुवया चढून गेल्या होत्या आणि तीक्ष्ण दाढांमुळें त्याचें तोंड भयंकर दिसत होतें. दैत्यांचा राजा हिरण्यकशिपु हा त्याच्यावर गदा घेऊन फुरफुरत धांवून आला, तेव्हां त्याला तत्क्षणीं आपल्या मांडीवर पाडून त्या नृसिंहमूर्तीनें त्याला नखांनीं फाडून टाकिलें ॥ १४ ॥

महाबलाढ्य अशा सुसरानें सरोवरांत गजेंद्राला पाय धरून ओढिलें असतां, तो गजेंद्र पीडित झाला आणि आपल्या सोंडेंत कमळ घेऊन, ' हे आदिपुरुषा, हे सर्वलोक-नायका, हे पुण्यकीर्ते, तुझ्या नांवाचा उच्चार श्रवण केल्यानेंच कल्याण होतें, ' अशी त्या परमेश्वराची स्तुति करू लागला ॥ १५ ॥

ब्रह्मदेव म्हणतात, नारदा, गजेंद्राची ती स्तुति ऐकून तो निरुपम आणि सर्वैश्वर्य-शाली असा श्रीहरि हातांत आपलें सुदर्शन चक्र घेऊन गरुडावर आरूढ झाला आणि ( सरोवराशीं येऊन ) त्यानें त्या मकराचें तोंड सुदर्शनानें फाडून ( त्याच्या कचाटींतून गजेन्द्राला सोडविलें व ) मोठ्या कृपाळूपणें शरण आलेल्या गजेन्द्राला सोंड धरून वर काढिलें ॥ १६ ॥

नंतर ईश्वरानें अदितीचा पुत्र म्हणून अवतार घेतला. हा पुत्र सर्वांत लहान असूनहि गुणांनीं श्रेष्ठ होता. म्हणून तोच श्रेष्ठ असा यज्ञभोक्ता होय. त्यानें वामनरूपानें तीन पावलांनीं तीन लोकांना व्यापून टाकिलें. तीन[1] पावलें भूमि मागण्याच्या मिषानें त्यानें बळीपासून सर्व पृथ्वी घेतली. कारण धर्ममार्गानें वर्तन करणाऱ्याला ऐश्वर्यभ्रष्ट करणें तें थोर लोकांना याचनेच्या मिषावांचून करतां येत नाहीं * ॥ १७ ॥

वामनाचे पाय धुण्यानें पवित्र झालेलें उदक आपल्या मस्तकीं धारण करणाऱ्या बलीला, देवांचें आधिपत्य म्हणजे कांहीं मोठी वस्तु होती असें नाहीं. पण नारदा, एकदां जी प्रतिज्ञा आपण केली, तीहून दुसरें कांहीं करावयाचेंच नाहीं, असें ठरविल्यामुळें, बळीनें त्या वामनरूप श्रीहरीपुढें मस्तक लवविलें आणि आपलें शरीर ईश्वरप्रीत्यर्थच आहे असें मानिलें ॥ १८ ॥

---

१ त्रीणि पदा विचक्रमे विष्णुर्गोपा अदाभ्यः ॥ अतो धर्माणि धारयन् ॥ ह्या ऋग्वेद-मंत्राचा यांत अनुवाद आहे.

* बली धर्ममार्गानें वागत होता, म्हणून याचनाच्या युक्तीचा अवलंब करावा लागला.

नारदा, आणि तुझाहि उत्कट भक्तिभाव पाहून परमेश्वर तुझ्यावर संतुष्ट झाला आणि त्यानें तुला त्या भक्तियोगाचा उपदेश करून आत्मतत्त्वाला प्रकाशित करणारा भागवत नांवाचा ज्ञानमार्ग दाखवून दिला. हा ज्ञानमार्ग परमेश्वराला शरण गेलेल्या पुरुषांना मात्र सहज समजतो. ( इतरांना तो समजणें शक्य नाहीं ) ॥ १९ ॥

प्रतिमन्वंतरामध्यें तो परमेश्वर मनुवंशाचें रक्षण करण्यासाठीं अवतार घेऊन दाही दिशांत आपलें अकुंठित असें प्रभावरूपी चक्र स्थापन करतो. राजे लोक दुष्ट झाले असतां तो त्यांचें दमन करितो आणि त्रैलोक्याचा पृष्ठभाग जो सत्यलोक तेथेंहि पराक्रमाच्या योगानें आपली सुंदर कीर्ति पसरितो ॥ २० ॥

नारदा, मानंतर परमेश्वराचा धन्वंतरि नांवाचा अवतार झाला. तो कीर्तीचा मूर्तिमंत पुतळा होता. केवळ त्याचें नामस्मरण केल्यानेंच अत्यंत रोगग्रस्त अशींहि मनुष्यें तत्काळ रोगमुक्त होतात. तो प्राण्यांच्या आयुष्यांतील मृत्यु नाहींसा करणारा असून, धन्वंतरीच्या नांवें मिळणारा यज्ञांतील जो हविर्भाग जो ( दैत्यांनीं ) बंद केला होता, तो त्यानें परत मिळविला. सांप्रत तो लोकांत अवतार घेऊन आयुर्वेदाचा उपदेश करीत आहे ॥ २१ ॥

क्षत्रियवर्ग सन्मार्गाचा त्याग करून ब्राह्मणांचा द्वेष करूं लागले, म्हणजे त्याला नरकयातनांचाच लोभ उत्पन्न झाला, असें होऊन त्यांच्या नाशाची सिद्धता दैव करीत असतें. असा तो क्षत्रियवर्ग भूमीला कांट्यासारखा झाल्यामुळें प्रखर पराक्रमाच्या त्या सर्वश्रेष्ठ परमेश्वरानें ( परशुरामाचा ) अवतार घेऊन आपल्या तीक्ष्ण परशूनें एकवीस वेळां त्यांचा नाश करण्याचा उपक्रम केला ॥ २२ ॥

ब्रह्मदेव म्हणतात, नारदा, तो सोळा कलांचा अधिपति ईश्वर आमच्यावर नित्य प्रसन्नमुख असतो. तो आपल्या अंशानें इक्ष्वाकूच्या कुलांत ( रामनामक ) अवतार घेईल आणि आपल्या पित्याची आज्ञा पाळण्याकरितां पत्नी अणि कनिष्ठ बंधु यांसह वनांत जाईल. तेथें त्याच्यापाशीं विरोध केल्यामुळें रावणाला मोठें दुःख प्राप्त होईल * ॥ २३ ॥

( पूर्वीं त्रिपुरासुरनामक दैत्याचें नगर जाळून टाकणाऱ्या शंकराप्रमाणें ) शत्रु झालेल्या त्या रावणाचें नगर जाळून टाकावेंसें त्या रामाला वाटेल, तेव्हां भयानें कांपूं लागलेला समुद्र त्याला एकाएकीं वाट करून देईल. रामाचें हृदयच अशी जी सीता तो दूर असल्यामुळें प्रखर क्रोधानें त्याचे डोळे अगदीं लाल होऊन त्या योगानें समुद्राच्या उदरांतील मकर, सर्प, सुसर इत्यादि जलचरांचा समुदाय अतिशय तप्त होऊन जाईल ॥ २४ ॥

रावणानें रामाची स्त्री हरण करून नेली असतां आपल्या वक्षःस्थलाशीं घर्षण झाल्यामुळें फुटून गेलेल्या ऐरावताच्या दातांचे तुकडे दशदिशांना उडालेले पाहून

* मुळांत 'आर्तिमार्च्छत्' म्हणजे दुःख प्राप्त झालें, असा भूतकाळी प्रयोगच आहे; पण ब्रह्मदेव-नारद-संवाद रामावतारापूर्वी झाला असें कल्पून टीकाकारांनीं रामापासूनच्या पुढील अवतारवर्णनांत भूतकाळ हा भविष्यार्थी समजावा, असा शेरा मारिला आहे.

'माझ्या दिग्विजयाचें या हत्तीच्या दांतांनींहि अनुकरण केलें काय' असें उपहासानें म्हणणाऱ्या आणि टणत्कार करीत सैन्यांच्या अग्रभागीं डौलानें फिरणाऱ्या रावणाचें हंसें, तो राम त्याच्या प्राणांसह तत्काल दूर करील ॥ २५ ॥

ब्रह्मदेव सांगतात,–नारदा, रामावतारानंतर दैत्यगणांपासून पीडा पावणाऱ्या पृथ्वीचें दुःख नष्ट करण्यासाठीं तो ईश्वर आपल्या बळरामनामक अंशासह अवतार घेईल. त्याचे केश श्वेत आणि कृष्ण अशा वर्णाचे असल्यामुळें तो एका अंशानें शुभ्र आणि दुसऱ्या अंशानें कृष्णवर्णाचा[1] होईल. त्याचे मार्ग लोकांच्या कल्पनेबाहेर असतील; पण तो आपला महिमा जेणेंकरून स्पष्ट होईल अशींच कामें करील ॥ २६ ॥

तो अगदीं अर्भकावस्थेंत असतानांच पूतनेचे प्राण हरण करील. पुढें तीन महिन्यांचा झाला असतां पायानें गाडा उलथील. नंतर रांगता झाल्यावर तो गगनचुंबित अशा दोन अर्जुन नामक वृक्षांमध्यें जाऊन ते उपटून टाकील. असले पराक्रम ईश्वरांशाशिवाय संभवनीय नाहींत ॥ २७ ॥

(नारदा, त्याचे आणखीहि पराक्रम ऐक). गोकुळांत तो विषमिश्रित पाणी पिऊन मरण पावलेल्या गाईंना आणि त्यांच्या गोवाऱ्यांना आपल्या (अमृतमय) कृपाकटाक्षांचा वर्षाव करून जिवंत करील. तसेंच कालियासर्पाच्या विषापासून (विषमय झालेलें) यमुनेचें पाणी शुद्ध करण्यासाठीं तो त्यांत क्रीडा करून भयंकर विषामुळें ज्याची जीभ थरथरत आहे, अशा त्या कालिया सर्पाला दूर घालवून देईल ॥ २८ ॥

ईश्वराचा पराक्रम खरोखर अगम्य आहे. मुंजाटवीनामक वनांत सर्व गोप गाढ निद्रेंत असतां उन्हाळ्यांत सुकून गेलेलें तें अरण्य वणव्यानें जळूं लागेल आणि गोपांसह गोकुळ नष्ट होण्याचा प्रसंग येईल; पण त्या वेळीं सर्वांस डोळे मिटावयास सांगून श्रीकृष्ण व बलराम त्यांचें संरक्षण करतील ॥ २९ ॥

त्या श्रीकृष्णाची माता एकदां त्याला बांधून मार देण्याचा विचार करील. तेव्हां जी जी दोरी त्याला बांधण्यासाठीं घेईल, ती ती त्या बालकृष्णाला अपुरीच होईल. मग श्रीकृष्ण जांभई देईल आणि त्याच्या मुखांत चौदा भुवनांचा विस्तार तिच्या दृष्टीस पडेल, त्या वेळीं तिच्या मनांतील अज्ञान नष्ट होऊन ती ज्ञानसंपन्न होईल ॥ ३० ॥

---

१ दैत्यपीडित पृथ्वी ब्रह्मदेवाला शरण गेल्यामुळें ब्रह्मदेव विष्णूजवळ जाऊन भूभार दूर करण्याबद्दल विष्णूची प्रार्थना करूं लागले. तेव्हां विष्णूनें आपल्या शरिरावरील एक पांढरा केस व एक काळा केस उपटून काढून ब्रह्मदेवाजवळ दिला व सांगितलें कीं, हे दोन केस भूभार हरण करितील. पांढरा केस तो बळराम व काळा केस तो श्रीकृष्ण (ब्रह्मपुराण पाहा.) अशीच कथा विष्णुपुराण आणि महाभारत यांतहि आहे. 'विष्णूचे हे शुभ्र आणि कृष्ण असे केश यदूंच्या कुलांत रोहिणी आणि देवकी यांत प्रवेश करून गौरवर्ण बलराम आणि कृष्णवर्ण कृष्ण या रूपानें अवतार झाले' असें महाभारतांत म्हटलें आहे.

आणखी तो आपला पिता जो नंद त्याला वरुणाच्या पाशांतून सोडवील. तसेंच मयासुराचा पुत्र जो व्योमासुर यानें गोपांना गुहांमध्यें अडकवून ठेविलें असतां तेथून त्यांची तो मुक्तता करील. आणि गोकुळांतील लोक दिवसा उपजीविकेच्या उद्योगानें श्रांत होऊन रात्रौ स्वस्थ घोरत पडले असतां तो श्रीकृष्ण साऱ्या गोकुळाला वैकुंठलोकास घेऊन जाईल ।। ३१ ।।

हे निष्पाप नारदा, ( एकदां गोकुळांतील ) ते गोप इंद्राकरितां करावयाचा यज्ञ बंद पाडतील व त्यामुळें क्रुद्ध होऊन इंद्र गोकुळ बुडवून टाकण्याकरितां भयंकर वृष्टि करील; पण त्या वेळीं सात वर्षांचा तो बाल श्रीकृष्ण कृपाळूपणें गाईचें रक्षण करण्याकरितां पावसाळयांतील आळंब्याच्या छत्रीप्रमाणें एका हातानें गोवर्धन पर्वत सात दिवसपर्यंत सहज उचलून धरील ( आणि गोकुळाचें रक्षण करील ) ।। ३२ ।।

चंद्राच्या किरणांनीं गौरवर्ण दिसणाऱ्या एका रात्रीं रास खेळण्यासाठीं उत्सुक होऊन श्रीकृष्ण कुंजवनांत विहार करील. तेथें त्याच्या मधुरशब्दयुक्त आलापांनीं आणि रागांच्या आरोहावरोहांनीं गोपस्त्रियांचा शृंगारविचार जागृत झाला असतां, कुबेराचा सेवक शंकचूड यक्ष, त्या गोपींना पळवून न्यावयास लागेल; पण नारदा, श्रीकृष्ण त्या यक्षाचें मस्तक छेदून टाकील ।। ३३ ।।

तसेंच, प्रलंब, फर, दर्दुर,केशी, अरिष्ट इत्यादि दैत्य व चाणूरादि मल्ल, कुवलयापीड नांवाचा मस्त हत्ती, कंस, कालयवन, भौमासुर, पौंड्रक इत्यादि दुष्ट पुरुष आणि दुसरे शाल्व, द्विविदनामक वानर, बल्वल, वक्रदंत, सात बैल; शंबर; विदूरथ, रुक्मी आदिकरून जे कोणी शत्रु होतील ते सर्व, तसेंच मत्स्य, कौरव, कैकय, सृंजय इत्यादि जे युद्धकुशल वीर हातांत धनुष्यबाण घेऊन युद्धांत विरोध करतील तेहि सारे, बळराम, भीम, अर्जुन अशा मायावी नांवानें वावरणाऱ्या श्रीकृष्णाच्या हातून समूळ नाश पावतील व त्यामुळें त्या श्रीकृष्णाच्या स्वरूपालाच ते प्राप्त होतील * ।। ३४ ।। ३५ ।।

( ब्रह्मदेव म्हणाले, नारदा, त्यानंतर ईश्वर आणखी व्यासरूपानेंहि अवतरेल. कारण ) कालान्तरानें उत्तरोत्तर युगांत लोकांची बुद्धि संकुचित होऊन त्यांचें आयुष्यमानहि थोडें होत जाईल. तेव्हां आपणच उत्पन्न केलेल्या वेदांना लोक अगदीं पारखे होतील, असें पाहून, ईश्वर सत्यवतीच्या पोटीं अवतार घेईल आणि वेदरूपी वृक्षाचे शाखारूपानें विभाग पाडील ।। ३६ ।।

---

* वर उल्लेखिलेल्या सर्वच दुष्टांना प्रत्यक्ष कृष्णानें मारलेलें नाहीं. उदाहरण, प्रलंब, खर, बिल्वल इत्यादिकांना बळरामानें मारलें; कांबोजादिकांना भीमार्जुनांनीं मारलें. शबराला प्रद्युम्नानें, कालयवनाला मुचकुंदानें इत्यादि; पण अर्जुन, भीम, प्रद्युम्न हे झाले तरी श्रीकृष्णाचींच रूपें होत असा भाव यांत दर्शविला आहे.

मयासुरानें निर्माण केलेल्या अदृश्यगति अशा नगरीच्या साहाय्यानें देवांचा द्वेष करणारे दैत्य, पुढें वेदमार्गानें निश्चयपूर्वक जाणाऱ्या लोकांचा घात करूं लागतील- तेव्हां, हे नारदा, त्या दैत्यांच्या बुद्धीला मोह पाडण्यासाठीं आणि त्यांना लोभ उत्पन्न करण्यासाठीं अवश्य असा वेष धारण करून ईश्वर अवतार * घेईल आणि नाना प्रकारच्या पाखंडधर्मांचा त्यांना उपदेश करील. ( दैत्य कुमार्गाला लागले म्हणजे त्यांचा नाश सहजच होईल ) ॥ ३७ ॥

नारदा, जेव्हां सज्जनांच्या घरांत देखील परमेश्वराच्या कथांचें गायन होणार नाहीं आणि सर्व द्विजे[1] पाखंडी मताचे होतील, तसेंच जेव्हां शूद्रांना राज्यपद मिळेल अणि स्वाहा, स्वधा, वषट् इत्यादि उच्चार ऐकूं येईनासे होतील, तेव्हां कलियुगाच्या अंतीं भगवान् परमेश्वर कलीचें शासन करण्यासाठीं अवतार[2] धारण करील ॥ ३८ ॥

नारदा, परमेश्वराच्या मायेच्या योगानें झालेल्या सामर्थ्यवान् अशा अनेक विभूति आहेत. त्यांपैकीं तपश्चर्या, मीं ब्रह्मदेव, ऋषि आणि नऊ प्रजापति या विभूतींची योजना सृष्टीच्या उत्पत्तीकडे केलेली आहे. धर्म, यज्ञ, मनु व देवांचे आणि पृथ्वीचे राजे यांच्याकडे सृष्टीच्या रक्षणाचें काम आहे आणि अधर्म, शंकर, क्रोधाधीन होणारे प्राणी, दैत्य इत्यादि विभूति सृष्टीच्या संहारकार्यांत नियुक्त केलेल्या आहेत ॥ ३९ ॥

पृथ्वीमध्यें असलेल्या परमाणूंचीहि गणति एखाद्या विद्वानानें केली असेल; पण तो तरी विष्णूच्या पराक्रमांची गणती करूं शकेल काय ? कारण त्रिगुणाची साम्यावस्था असलेल्या ठिकाणासह जोरानें कंप पावणाऱ्या सत्यलोकाला त्या विष्णूनें सावरून धरलें व तसें करतांना त्याचें पाऊल मुळींहि इकडेतिकडे चळलें नाहीं ॥ ४० ॥

ब्रह्मदेव म्हणतात, नारदा, मलाहि ह्या आदिपुरुष श्रीविष्णूच्या मायाशक्तीचा थांग लागलेला नाहीं. तुझ्या ह्या सनत्कुमारादि वडील बंधूंनाहि तो लागला नाहीं. मग जे इतर कोणी आहेत त्यांनां तो कसा समजणार ? सहस्रमुखांचा शेष त्याचे गुण गात गात त्याच्या मायेचा पार लावण्याचा प्रयत्न सारखा करीत आला आहे; पण अद्यापि त्याला सुद्धां तो पार लागलेला नाहीं ॥ ४१ ॥

जेथें निष्कपटपणा असेल तेथें भगवंताची कृपा होते. जे कोणी सर्वस्व अर्पण करून त्याच्या पदाचा आश्रय करतात, त्यांच्यावर तो परमेश्वर कृपा करतो आणि मग ते तरून जाण्यास कठीण अशा ईश्वरी मायेला तरून जातात. मग त्यांची ममत्वबुद्धि कुत्र्या-कोल्ह्यांच्या भक्ष्यस्थानीं पडण्यासच योग्य अशा या शरिरावर राहातच नाहीं ॥ ४२ ॥

---

* हा बुद्धावतार होय.

१ द्विजांत ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य या तिघांचाहि समावेश आहे.

२ हा कलंकी अवतार होय.

नारदा, त्या परमेश्वराच्या योगमायेचें ज्ञान असणारे खरोखर फारच थोडे पुरुष आहेत. मी तिला जाणतों, तूं जाणतोस, शंकराला तिचें ज्ञान आहे आणि तसेंच तें दैत्यश्रेष्ठ प्रल्हादालाहि आहे. स्वायंभुवमनूची पत्नी शतरूपा, त्याचे प्रियव्रतादिक पुत्र, तसेंच आणखी प्राचीनबर्हि, ऋभु, अंग, ध्रुव, इक्ष्वाकु, ऐल, मुचकुंद, जनक, गाधि, रघु, अंबरीष, सगर, गय, ययाति इत्यादि; मांधाता, अलर्क, शतधनु, अनु, रंतिदेव, भीष्म, बलि, अमूर्तरय, दिलीप, सौभरि, उतंक, शिबि, देवल, पिप्पलाद, सारस्वत, उद्धव आणि भूरिषेण, तसेच दुसरे जे बिभीषण, हनुमान्, विष्णु, दत्त, पार्थ, आर्ष्टिषेण, बिदुर, श्रुतदेव आदिकरून श्रेष्ठ भक्त, ते सर्व परमेश्वराच्या मायेचें स्वरूप जाणतात ।। ४३ ।। ।। ४४ ।। ४५ ।।

अद्भुत पराक्रम करणाऱ्या परमेश्वराच्या भक्तांसारखें शील व्हावें म्हणून जे तसें शिक्षण घेतात, ते पापी असले किंवा स्त्री, शूद्र, हूण, शबर इत्यादि वर्गांतील असले, किंबहुना पशुयोनींतील असले, तरी देखील त्यांना परमेश्वरी मायेचें ज्ञान होतें आणि ते ती माया तरून जातात. मग ज्यांना शास्त्रार्थाचें आकलन करण्याचें सामर्थ्य आहे, असे पुरुष ती माया तरून जातील हें काय सांगावयास पाहिजे ? ।। ४६ ।।

ज्याला ज्ञानी पुरुष ब्रह्म असें म्हणतात, तें त्या भगवान् परमपुरुषाचें स्वरूप होय. तें नित्य, शांत आणि अत्यंत सुखात्मक आणि शोकरहित आहे. तें एकच भेदभावरहित असल्यामुळें त्या ठिकाणीं भय हा शब्दच नाहीं. तें केवळ ज्ञानस्वरूप असून अव्यक्त किंवा व्यक्त यांच्या पलीकडचें आत्मस्वरूपी असेंच आहे. त्या ठिकाणीं शब्दरूप वेदाचीहि गति नाहीं. तसेंच तेथें अनेक साधनांनीं होणाऱ्या नानाविध क्रियांचा अर्थहि संभवत नाहीं. ( कारण तें ब्रह्म निष्क्रिय, निर्गुण इत्यादि प्रकारें वर्णनातीत आहे. ) मायेची गति तेथें असेल म्हणावें तर ती त्याच्या सन्मुख यावयालाच लाजते आणि म्हणून त्यापासून नित्य दूर राहते. त्याच्या प्राप्तीसाठीं योगी पुरुष मनाचें नियमन करतात आणि त्याची प्राप्ति झाली म्हणजे योगादि साधनें टाकून देतात. स्वतःच्या केवळ शरिरानेंच शोभणारा कामकरी, विहीर खणण्याचीं हत्यारें, ती खणून झाल्यावर जशीं टाकतो किंवा मेघराजा इन्द्र, विहिरीची आवश्यकता नसल्यामुळें हत्यारें हातांतहि धरीत नाहीं, ( तसाच हा ईश्वरप्राप्ति करून घेतलेल्या सिद्धपुरुषांचा प्रकार होय ) ।। ४७ ।। ४८ ।।

नारदा, तो भगवान् आत्यंतिक कल्याणांचाहि स्वामी आहे. ब्राह्मणादि वर्ण आणि त्यांचे शमदमादि स्वभाव यांनीं युक्त अशा कर्ममार्गाची उत्पत्ति त्याच्यापासूनच झाली. महाभूतांपासून झालेला देह विस्कळित होऊन तीं भूतें विमुक्त झालीं, तरी जन्मरहित असा तो आत्मस्वरूपी पुरुष मात्र नाश पावत नाहीं. आकाशाप्रमाणें तो स्थिरच राहतो ।।४९।।

ब्रह्मदेव म्हणतात, बा नारदा, अशा त्या विश्वरक्षक परमेश्वराचें स्वरूप मीं तुला संक्षेपानें सांगितलें. त्याचें तात्पर्य एवढेंच कीं, कार्यकारणरूप जें कांहीं या विश्वांत आहे, तें त्या सर्वांच्या पलीकडे असलेल्या परमेश्वराच्या स्वरूपाहून भिन्न नाहीं ।। ५० ।।

नारदा, याला भागवत असें म्हणतात. भगवंतानेंच हें मला सांगितलें. यांत परमेश्वरी विभूतीचें वर्णन संक्षेपानें केलेलें आहे. त्याचा तूं आतां विस्तार कर ! ॥ ५१ ॥

नारदा, तो भगवान् श्रीहरी सर्वांचा अन्तर्यामीं आणि सर्वांचा आधार आहे. त्याच्याविषयीं मनुष्यांमध्यें उत्कट भक्ति जेणेंकरून उत्पन्न होईल, अशा रीतीचा दृढ संकल्प करून तूं त्याचें वर्णन कर ! ॥ ५२ ॥

जो पुरुष ह्या परमेश्वराच्या मायेचें वर्णन करितो किंवा तिचें वर्णन करणाराला संमति देतो किंवा जो नित्य श्रद्धापूर्वक त्याचें श्रवण करतो, त्याचें अंतःकरण मायेनें मोह पावत नाहीं ॥ ५३ ॥

**सातवा अध्याय समाप्त**

# अध्याय ८ वा

राजा परीक्षित् म्हणाला—' हे शुकमुने, निर्गुण अशा परमेश्वराचें गुणवर्णन करण्याची प्रेरणा ब्रह्मदेवानें नारदाला केली असतां, त्या देवासमान दिसणाऱ्या नारदानें पुढें कोणकोणाला त्या श्रीहरीच्या कथा सांगितल्या, हें समजण्याची मला मोठी उत्कंठा आहे. मुने, तुम्हीं वेदवेत्त्यांत श्रेष्ठ आहां, यास्तव अद्भुत पराक्रम करणाऱ्या त्या ईश्वराच्या नारदोक्त कथा तुम्ही मला सांगा. त्या कथा लोकांचें आत्यंतिक कल्याण करणाऱ्या आहेत ॥ १ ॥ २ ॥

हे महाभाग्यशाली मुने, सर्वांच्या अंतर्यामीं वास करणारा असा जो भगवान् श्रीकृष्ण, त्याच्या ठिकाणीं जेणेंकरून माझें मन स्थिर राहील आणि त्याला कसलीहि दुसरी आसक्ति न राहतां, मी हें शरीर टाकून देण्यास समर्थ होईन, असें साधन आतां मला तुम्ही सांगा ॥ ३ ॥

जो कोणी परमेश्वराच्या लीलांचें भक्तिपूर्वक श्रवण करतो आणि स्वतः त्यांचें गायन करतो, त्या पुरुषाच्या हृदयांत भगवान् लवकरच प्रवेश करतो ॥ ४ ॥

परीक्षित्राजा म्हणतो–हे शुकाचार्या ! ज्याप्रमाणें पावसाळ्यांत गढूळ पाणी शरदृतूचा आरंभ झाला असतां स्वच्छ होतें, त्याप्रमाणें भगवान् श्रीकृष्ण एकदां आपल्या भक्तांच्या हृदयकमळांत प्रविष्ट झाला, म्हणजे त्या भक्तांच्या मनांतील पापहि दूर होऊन तें अगदीं निर्मळ होतें ॥ ५ ॥

हे शुकाचार्य, प्रवास करून थकलेला मनुष्य घरीं परत आला असतां, तो जसें आपलें घर सोडीत नाहीं, त्याप्रमाणें श्रीकृष्णस्मरणानें ज्याचें अंतःकरण शुद्ध झालें आहे, तो पुरुष सर्व क्लेशांपासून मुक्त होतो आणि मग तो श्रीकृष्णाचें चरणकमल कधींच सोडीत नाहीं ॥ ६ ॥

हे शुकमुने, जीव कांहीं पंचमहाभूतात्मक नाहीं; पण त्याचें हें शरीर मात्र पंचमहाभूतांपासूनच उत्पन्न होतें. हा जो चमत्कार घडतो, तो सहजगत्या घडतो किंवा त्याच्या बुडाशीं कांहीं कारण आहे, याचें यथातथ्य ज्ञान तुम्हांला आहे. तरी तो विषय तुम्ही मला स्पष्ट करून सांगा ॥ ७ ॥

परमेश्वराच्या उदरावरील नाभीपासून जें कमल उत्पन्न झालें, त्याचें स्वरूप म्हणजे विश्वरचना हेंच होतें. त्या ईश्वराचें स्वरूप सांगतांना अमुक रीतीची त्याच्या अवयवांची रचना आहे असें तुम्हीं सांगितलें; पण ज्या प्रकारची अवयवरचना ह्या लौकिक पुरुषाची असते, तशीच त्या परमपुरुषाचीहि जर असेल, तर त्या दोघांत भेद तो काय ? ॥ ८ ॥

नाभिकमळापासून झालेला सृष्टिकर्ता ब्रह्मदेव ज्याच्या कृपेनें प्राण्यांना उत्पन्न करतो तसेंच ज्या परमेश्वराच्या कृपेनें त्या ब्रह्मदेवाला त्याच्या स्वरूपाचें दर्शन घडलें; तसेंच या विश्वाची उत्पत्ति, रक्षण आणि लय करणारा आणि सर्व प्राणिमात्रांच्या अंतःकरणांत वास करून मायेवर सत्ता चालविणारा तो पुरुष, आपल्या मायेला सोडून ज्या स्वरूपानें शयन करितो, त्याचें ज्ञान तुम्ही मला सांगा ) ॥ ९ ॥ १० ॥

परीक्षित्राजा म्हणतो—शुकमुने, पृथ्वी आदिकरून अनेक लोक आणि त्यांचें रक्षण करणारे देव परमेश्वराच्या अवयवांपासून झाले असें + पूर्वीं तुम्हीं सांगितलें; तसेंच पुनः त्या पुरुषाच्या अवयवांची कल्पना, ते लोक आणि त्यांचे लोकपाल यांच्या योगानें करतात, असेंहि १ सांगितलेलें आम्हीं ऐकिलें. तेव्हां यांतील निश्चित खरें काय ? ॥ ११ ॥

मुने, * कल्प आणि विकल्प यांच्या काळाचें प्रमाण केवढें ठरविलेलें आहे; त्याप्रमाणेंच भूत, भविष्य आणि वर्तमान, हे शब्द कशाचे वाचक आहेत आणि ह्या व्यक्त सृष्टींतील नानाविध प्राण्यांच्या आयुष्याचें मान किती आहे, ( या सर्व गोष्टी मला समजावून सांगा ) ॥ १२ ॥

राजा म्हणाला—हे ब्रह्मश्रेष्ठ शुकाचार्य, कालाची गति सूक्ष्म तशीच स्थूल अशी दोन्ही प्रकारची दिसते. तशाच कर्मांच्या गति किती व कोणत्या प्रकारच्या आहेत ? तसेंच सत्त्व आदिकरून गुणांचें कार्य घडून देव, मनुष्य इत्यादिक देहांची प्राप्ति व्हावी अशी इच्छा करणारे जे जीवात्मे, ते आपल्या चांगल्या किंवा वाईट कर्मांचा समूह आपल्या-बरोबर कोणत्या रीतीनें घेऊन जातात ? ( त्याचप्रमाणें ) पृथ्वी, पाताळ, दिशा, आकाश, ग्रह, नक्षत्रें, पर्वत आणि नद्या, समुद्र व द्वीपें, तसेंच त्या सर्वांवर वास करणारे जीव, यांची उत्पत्ति कशी झाली, हेंहि मला सांगा ॥१३॥१४॥१५॥

राजा म्हणाला—हे मुने, या ब्रह्मांडाचा विस्तार आंतून आणि बाहेरून केवढ्या प्रमाणाचा आहे, तसेंच थोर पुरुष कसें आचरण करतात, आणि ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे वर्ण आणि ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ व संन्यास हे आश्रम, त्यांचीं स्वरूपें आणि आचारधर्म कसे निश्चित केलेले आहेत ? त्याचप्रमाणें परमेश्वरानें नानाविध अवतार घेऊन जीं अत्यंत अद्‌भुत अशीं चरित्रें दाखविलीं तीं कोणतीं ? युगें किती आहेत, त्यांचें प्रमाण काय आणि प्रत्येक युगाचे धर्म कोणते ? तसेंच मनुष्याचे सर्वसाधारण धर्म कोणते,

---

+ या स्कंधांत अ. ५ श्लोक ३८ ते ४२ पाहा.

१ या स्कंधाचा अ. १ श्लोक २६ ते २८ पाहा.

* ११ व्या श्लोकापर्यंतच्या पूर्वींच्या विवेचनावरून उत्पन्न झालेल्या शंका परी-क्षितीनें विचारिल्या. १२ व्या श्लोकापासून नवीन विषयांची माहिती तो विचारीत आहे.

वर्णाश्रमविशिष्ट धर्म कोणते, तसेंच विविध उद्योग करून निर्वाह करणाऱ्यांचे धर्म काय, श्रेष्ठ *राजांचा धर्म कोणता, आणि संकटांत+ कालक्रमणा करणाऱ्यांचा धर्म कोणता ? तें ऐकण्याची माझी इच्छा आहे ॥ १६ ॥ १७ ॥ १८ ॥

शुकाचार्य हो, महत् आदिकरून तत्त्वें किती आहेत व त्यांचीं लक्षणें कोणतीं, तसेंच तीं उत्पन्न होण्याचीं कारणें कोणत्या प्रकारचीं आहेत, परमेश्वराच्या उपासनेचा शास्त्रोक्त मार्ग कोणता आणि योग व अध्यात्मविद्या यांचे मार्ग कसे आहेत; त्याचप्रमाणें मोठमोठे योगी कोणत्या मार्गानें ईश्वराची प्राप्ति करून घेतात, त्या योग्यांच्या सूक्ष्म अशा लिंगदेहाचा शेवटीं लय कसा होतो, तसेंच वेदं[1], उपवेद[2], धर्म[3], इतिहास[4] आणि पुराणें[5], यांचीं स्वरूपें काय आहेत; सर्व भूतांची उत्पत्ति कशी होते, त्यांचा उत्कर्ष कसा होतो आणि शेवटीं त्यांचा लय कोणत्या प्रकारानें होतो, तसेंच अग्निहोत्रादि वैदिक कृत्यें[6] आणि विहिरी, तलाव आदिकरून लौकिक कृत्यें अशीं जीं सकाम कर्में आहेत तीं करण्याच्या शास्त्रोक्त रीति कोणत्या आणि धर्म, अर्थ व काम हे पुरुषार्थ कसे साध्य करावे ? हें सर्व मला सांगा ॥ १९ ॥ २० ॥ २१ ॥

राजा म्हणाला—शुकमुने, प्रलयांत जीवाच्या उपाधींचा लय होत असल्यामुळें पुढें त्यांची उत्पत्ति कशी होते, नास्तिकवादाचा प्रादुर्भाव कसा होतो, जीवात्म्याला बंधन कसें घडतें आणि त्याची सुटका कशी होते, तसेंच तो आत्मा केवळ आपल्या निर्गुण स्वरूपानें राहातो म्हणजे काय ? परमेश्वर स्वतंत्र आणि सर्वव्यापी आहे; पण तो मायेच्या योगानें लीला कशी दाखवितो किंवा त्या मायेला सोडून तटस्थपणें उदासीन असा कसा राहातो ? तें सर्व मला सांगा ॥ २२ ॥ २३ ॥

---

* श्रीमन्महाभारतांत शांतिपर्वांत पोटविभागानें स्वतंत्र तीन पर्वें देऊन राजधर्मपर्वांत राजर्षीचे धर्म, आपद्धर्मपर्वांत आपत्कालीं आचरावयाचे धर्म व मोक्षधर्मपर्वांत मोक्षदायक धर्म सांगितले आहेत.

+ ‘ कृच्छ्रेषु जीवतां ’ म्हणजे आपत्कालांत सांपडलेल्या प्राण्यांचे, असा अर्थ.

१ ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद हे चार वेद.

२ आयुर्वेद, गांधर्ववेद, धनुर्वेद, स्थापत्यवेद हे चार उपवेद.

३ वर्णधर्म, आश्रमधर्म, राजधर्म, मोक्षधर्म व आपद्धर्म हे पांच धर्म.

४ श्रीमन्महाभारत हा इतिहास.

५ ब्रह्मादि अठरा महापुराणें, गणेशपुराणादि अठरा उपपुराणें व सनत्कुमारपुराणादि अठरा उपोपपुराणें.

६ इष्ट आणि पूर्त. इष्ट म्हणजे अग्निहोत्र, तप, सत्य, वेदरक्षण, आतिथ्य व वैश्वदेव हीं कृत्यें, आणि पूर्त म्हणजे धर्मार्थ देवळें इत्यादि बांधणें, पाणपोया घालणें, इत्यादि कृत्यें. पुढें ७ व्या स्कंधत (अ. १५ श्लो. ४८,४९) इष्टापूर्तकर्मांचीं नांवें दिलीं आहेत.

राजा पुढें म्हणाला—हे सर्वसमर्थ शुकाचार्य, मी तुम्हांला शरण आलों असून या सर्व गोष्टींचें ज्ञान व्हावें म्हणून प्रश्न करीत आहें. तरी या प्रश्नांचीं उत्तरें आणि तशाच दुसऱ्या कांहीं सांगण्यासारख्या गोष्टी असल्या तर त्याहि कृपा करून तुम्ही मला सांगा. मुने, या ज्ञानाच्या विषयांत स्वयंभू ब्रह्मदेवाला जसें प्रमाण समजतात, तसे तुम्हीं प्रमाणच आहां, ( कारण तुम्हांला तें ज्ञान परंपरेनें नीट कळलेलें आहे ). पण इतर लोकांची गोष्ट पाहिली तर ते आपल्या वाडवडिलांनीं जसें केलें, त्याचें केवळ विचार न करतां अनुकरण करतात. ( अर्थात् त्यांचें म्हणणें प्रमाणभूत नाहीं. ) ॥ २४ ॥ २५ ॥

राजा म्हणाला,—शुकाचार्य हो, मी जरी उपवास करीत आहें, तरी तुम्ही सांगत असलेल्या भगवंताच्या अमृतासारख्या मधुर कथा श्रवण करीत असल्यामुळें, माझे प्राण मुळींच कासावीस होत नाहींत. ब्राह्मणाच्या कोपामुळें[1] या प्राणाला जें काय दुःख होईल तेवढेंच. ( पण उपवासाचें मला कांहींच दुःख वाटत नाहीं ) ॥ २६ ॥

सूत म्हणतो–शौनकऋषि हो, याप्रमाणें परीक्षित्‌राजानें श्रीकृष्णाच्या कथा सांगण्याविषयीं शुकाचार्यांची प्रार्थना केली, तेव्हां शुकाचार्य फार संतुष्ट झाले आणि त्यांनीं हें भागवतपुराण त्याला सांगितलें. ऋषि हो, पूर्वीं ब्रह्मकल्प[2] जेव्हां चालू झाला, त्या वेळीं वेदतुल्य असें हें भागवत भगवंतानें स्वतःच ब्रह्मदेवाला सांगितलें होतें ॥ २७ ॥ २८ ॥

सूत म्हणतात, शौनक हो, पांडवकुलभूषण अशा त्या परीक्षितीनें याप्रमाणें जें जें म्हणून शुकाचार्यांना विचारलें, तें तें सर्व शुकाचार्यांनीं त्याला यथाक्रम सांगण्यास आरंभ केला ॥ २९ ॥

---

१ श्रीमद्भागवताच्या पांचव्या स्कंधांत ( अ. १० श्लो. १७ ) रहूगणराजा जडभरताला म्हणतो कीं, ब्राह्मणाचा अपमान झाल्याची मला जितकी भीति वाटते, तितकी दुसऱ्या कोणत्याहि इतर गोष्टीनें वाटत नाहीं.

२ स्कंधपुराणांत अवंतिकाखंडामध्यें ब्राह्मकल्प, पाद्मकल्प, मात्स्यकल्प, वाराहकल्प इत्यादि एकवीस कल्प सांगितले आहेत.

## आठवा अध्याय समाप्त

# अध्याय ९ वा

शुकाचार्य म्हणतात,— हे परीक्षित्‌राजा, वास्तविक पाहिलें तर, आनंदानुभव हेंच परमात्म्याचें स्वरूप होय; पण स्वप्नांत विविध पदार्थ पाहणारा पुरुष जसा त्यांच्याशीं आपला संबंध मानितो, त्याप्रमाणें मायेचा आश्रय करावा तेव्हांच आत्मा आणि जड वस्तु यांचा संबंध भासूं लागतो. खरोखर पाहिलें तर तो संबंध कधींच घडत नाहीं ॥ १ ॥

राजा, माया हीच स्वतः अनेक रूपें धारण करते व त्यामुळें आत्माहि तशींच नाना रूपें घेतो असें भासतें. सत्त्व, रज आणि तम हे जे मायेचे गुण, त्या गुणांत आत्मा रममाण झाला म्हणजेच तो, मी हा असा, आणि हें माझें, असें मानूं लागतो. ( वस्तुतः तो गुणांपासून अगदीं अलिप्त आहे ) ॥ २ ॥

राजा, ईश्वराचा महिमा काळ आणि माया यांच्या पलीकडे आहे. तो महिमा समजून आत्मा जेव्हां आपल्या निर्मळ स्वरूपांत रंगूं लागतो, तेव्हां त्याचा सर्व भ्रम नाहींसा होतो. प्रकृतीच्या कार्याशीं संबंध असणारा असा मी आहें आणि हीं कार्यें माझींच होत, अशा प्रकारची त्याची भावना तेव्हां नष्ट होते आणि तो आपल्या खऱ्या तटस्थ अशा केवळ साक्षीस्वरूपानें राहूं लागतो ॥ ३ ॥

ब्रह्मदेवानें निष्कपटपणें तपश्चर्यारूप व्रताच्या आचरणानें भगवंताची सेवा करून त्याला संतुष्ट केलें. त्या वेळीं भगवंतानें आपलें खरें स्वरूप ब्रह्मदेवाला दाखविलें आणि ( तें स्वरूप प्राप्त करून घेण्याच्या मार्गाचा ) त्याला उपदेश केला. तो उपदेशच जीवाला शुद्ध तत्त्वज्ञान होण्यास श्रेष्ठ असें साधन आहे * ॥ ४ ॥

आदिदेव आणि विश्वांचा श्रेष्ठ गुरु असा तो ब्रह्मदेव, एकदां आपल्या कमलासनावर बसून सृष्टि कशी उत्पन्न करावी असा विचार करूं लागला; पण हा प्रपंच निर्माण कसा करावा याचा मार्ग त्याला समजेना व त्या कामीं उपयुक्त असा विचारहि त्याच्या मनांत कांहीं येईना ॥ ५ ॥

---

* ईश्वरालाहि जर शरीर आहे, तर त्याच्यांत आणि सामान्य पुरुषांत भेद तो काय ? अशा आशयाचा मागील अध्यायाच्या ८ व्या श्लोकांत परीक्षितानें संशय प्रदर्शित केला, त्याचें उत्तर या श्लोकांत आहे, असें श्रीधर म्हणतात. जीवाचा देह अविद्येच्या योगानें घडलेला मिथ्यारूप असतो आणि ईश्वराचा योगमायेनें घडलेला चित्स्वरूपी असतो, असा भेद आहे; म्हणून ईश्वराच्या स्वरूपदर्शनानें जीवाला मोक्षप्राप्ति होते असा भाव.

तो सर्वव्यापी ब्रह्मदेव अशा रीतीनें विचार करीत बसला असतां एकदां असें घडलें कीं, पाण्यांतून उच्चारिलेला ' तप ' असा ध्वनि त्याला दोन वेळ ऐकूं आला. ' तप ' शब्द * स्पर्श नामक जीं ' क ' पासून ' म ' पर्यंतचीं पंचवीस अक्षरें त्यांतील सोळावें ' त ' आणि एकविसावें ' प ' या दोन अक्षरांमिळून झालेला आहे. ( शुकमुनि म्हणाले ) राजा, हा ' तप ' शब्द म्हणजे सर्व धनाचा ज्यांनीं त्याग केलेला आहे, त्या वैराग्यशाली पुरुषांचा ठेवाच होय असें ज्ञाते समजतात ॥ ६ ॥

ब्रह्मदेवानें तो ' तप, तप ' असा ध्वनि ऐकिला आणि त्याचा उच्चार कोणी केला म्हणून तो दाही दिशांकडे दृष्टि फिरवून पाहूं लागला; पण तेथें दुसरें कोणीहि त्याच्या दृष्टीस पडलें नाहीं. तेव्हां आपल्या कमलासनावर बसल्याबसल्या त्यानें ' तप ' हेंच आपल्याला कल्याणप्रद आहे असें ठरविलें आणि गुरूकडून जणूं काय उपदेशच मिळाला असें समजून तपच करण्याचा त्यानें मनाशीं निश्चय केला ॥ ७ ॥

ब्रह्मदेवानें ' तप तप ' हा ध्वनि ऐकिला, तो कांहीं व्यर्थ गेला नाहीं. तपश्चर्येला आरंभ करून तो तपस्व्यांमध्यें श्रेष्ठ असा तपस्वी बनला. त्यानें वायूचा आणि मनाचा निरोध केला, ज्ञानेंद्रियें आणि कर्मेंद्रियें अशीं दोन्ही प्रकारचीं इंद्रियें स्वाधीन करून घेतलीं आणि मोठ्या सावधानपणें देवांचीं सहस्र वर्षेंपर्यंत तप केलें. राजा, त्या तपानें सर्व लोक प्रकाशित झाले ॥ ८ ॥

त्या तपानें भगवान् श्रीहरी ब्रह्मदेवावर प्रसन्न झाले आणि त्यांनीं त्याला स्वतःचा लोक दाखविला. त्या भगवंताच्या लोकांत क्लेश, मोह आणि भीति ह्यांस थारा नव्हता. आत्मज्ञानसंपन्न असे देवहि त्याची स्तुति करीत होते आणि त्यांच्याहून श्रेष्ठ असें दुसरें कांहींच नव्हतें ॥ ९ ॥

शुक म्हणतात, हे परीक्षित्राजा, त्या भगवंताच्या लोकांत रज आणि तम या गुणांचें वारें नाहीं; तसेंच त्या दोन गुणांचें ज्यांत मिश्रण आहे असा सत्त्वगुणहि तेथें नाहीं. त्या ठिकाणीं काळाची मात्रा चालत नाहीं व मायेचेंहि अस्तित्व नाहीं, मग इतर उपाधि कोठून असणार ? भगवंताच्या व्रताचा अंगीकार ज्यांनीं केलेला आहे, असे भगवद्भक्त मात्र तेथें राहतात. या भक्तांची थोरवी एवढी आहे कीं, देव आणि असुर हेहि त्यांची पूजा करितात ॥ १० ॥

---

* " **कादयो मावसानाः स्पर्शाः** " असें व्याकरणशास्त्रावरील सिद्धांतकौमुदी-नामक ग्रंथांत म्हटलें आहे. " **स्वरा विंशतिरेकश्च स्पर्शानां पञ्चविंशतिः** " असें शिक्षेंत सांगितलें आहे. कपासून मपर्यंत म्हणजे क, ख, ग, घ, ङ, च, छ, ज, झ, ञ, ट, ठ, ड, ढ, ण, त, थ, द, ध, न, प, फ, ब, भ, व म ह्यांना स्पर्श अशी संज्ञा आहे. कपासून मोजून येणारें सोळावें अक्षर " **त** " व एकविसावें अक्षर " **प** " हीं दोन अक्षरें अनुक्रमानें एकदम उच्चारिलीं म्हणजे " **तप** " असा शब्द निष्पन्न होतो.

राजा, त्या भगवद्भक्तांचा वर्ण निळा असून ते फार तेजस्वी दिसतात. त्यांचे नेत्र कमळासारखे, वस्त्रें पिंवळ्या रंगाचीं आणि कांति फार सुंदर व सुकुमार आहे. त्या सर्वांना चार हात असून त्यांनीं तेजस्वी रत्नखचित असे सुवर्णाचे अलंकार धारण केलेले असतात. त्या अलंकारांचें तेज पोवळीं, वैडूर्यमणि किंवा कमलतंतु यांच्या वर्णाचें असून चकाकत असतें. त्यांनीं कानांत कुंडलें, मस्तकावर मुकुट आणि गळ्यांत माळा धारण केलेल्या असून त्यांचा चकचकाट सर्वत्र पडलेला असतो ॥ ११ ॥

त्या लोकांच्या सभोंवतीं महात्म्या साधूंच्या दैदीप्यमान अशा विमानांच्या रांगा लागून गेलेल्या असतात. तशाच सुंदर तरुण स्त्रियाहि तेथें चमकत असतात व त्यामुळें बिजेनें भरलेल्या मेघसमूहानें आकाश जसें शोभिवंत दिसतें, तसा तो लोक शोभायमान दिसतो ॥ १२ ॥

त्या लोकांत मूर्तिमंत लक्ष्मी,आपला प्रियपति जो परमेश्वर, त्याची अनेक ऐश्वर्ययुक्त सामग्रीनें सेवा करीत असते. ती झोंपाळ्यावर बसून त्याच्या चरित्राचें वर्णन करिते आणि वसंतऋतूचे अनुचर असे जे भ्रमर ते तिच्या गुणांचें गायन करीत असतात ॥ १३ ॥

राजा, त्या लोकांत सर्व भक्तांचें रक्षण करणारा असा जो यज्ञभोक्ता त्रैलोक्यनायक लक्ष्मीपति परमेश्वर, तो ब्रह्मदेवाच्या दृष्टीस पडला. त्याच्या भोंवतीं सुनंद, नंद, प्रबल, आर्हण इत्यादि सेवकगण असून ते त्याची सेवा करीत होते ॥ १४ ॥

शुकाचार्य म्हणतात, राजा, तो चतुर्भुज भगवान् भक्तांवर कृपा करण्यासाठीं अगदीं उत्सुक असा होता. त्याचे नेत्र मद्याप्रमाणें मोहक होते. त्याच्या मुखावर सुंदर असें स्मित झळकत असून नेत्र आरक्त होते. त्यानें किरीट व कुंडलें धारण केलीं असून पीतांबर परिधान केला होता आणि त्याच्या वक्षःस्थलावर श्रीवत्सलांछन चमकत होतें ॥ १५ ॥

परमेश्वर उंच अशा उत्तम सिंहासनावर बसला होता व त्याच्या सभोंवार प्रकृति, पुरुष, महत्तत्त्व व अहंकार हीं चार तत्त्वें, पंचज्ञानेंद्रियें, पंचकर्मेंद्रियें पंचज्ञानविषय आणि मन अशा सोळा कळा आणि पृथ्वी, जल, तेज, वायु, आकाश हीं पंचमहाभूतें अशीं पंचवीस तत्त्वें उभीं होतीं. ऐश्वर्य म्हटलें तर तें इतर ठिकाणीं चंचल असतें; पण परमेश्वराचें ऐश्वर्य अढळ असून तो स्वतःच्या तेजःस्वरूपांत रमून गेला होता ॥ १६ ॥

शुकमुनि म्हणतात—राजा, परमेश्वराचें चरणकमल परमहंसांच्या मार्गानें गेलें तरच प्राप्त होण्यासारखें आहे. ब्रह्मदेवानें त्या भगवंताच्या मूर्तीला जेव्हां पाहिलें, तेव्हां त्याचें अंतःकरण आनंदानें भरून गेलें आणि त्याच्या शरिरावर रोमांच उभे राहिले. त्याच्या नेत्रांतून आनंदाश्रूंचा लोट वाहूं लागला व त्यानें त्या भगवंताच्या चरणीं लोटांगण घातलें ॥ १७ ॥

तो भगवान् सर्वांनाच प्रिय आहे. ब्रह्मदेवाचें तप पाहून त्याचें मन प्रसन्न झालें होतें. ब्रह्मदेवाला जवळ आलेला पाहून, सृष्टि उत्पन्न करण्याच्या कामीं याला उपदेश

करणें उचित होय, असें भगवंताला वाटलें. त्यानें ब्रह्मदेवाच्या हाताला * स्पर्श केला व मंद हास्ययुक्त अशा गोड शब्दांनीं त्याच्याशीं बोलण्यास आरंभ केला ॥ १८ ॥

श्रीभगवान् म्हणाले—ब्रह्मदेवा, तुझ्या उदरांत सर्व वेद सांठविलेले आहेत. ( तेव्हां तुला ठाऊकच आहे कीं ) मला संतुष्ट करणें हें कांहीं तरी भोगेच्छा मनांत धरून भक्तियोग आचरणारांना शक्य नाहीं; पण सृष्टि उत्पन्न करण्याच्या इच्छेनें तूं जें चिरकाल तप केलेंस, त्यायोगें मात्र मी अत्यंत संतुष्ट झालों आहें ॥ १९ ॥

ब्रह्मदेवा, मी वर देण्यास समर्थ आहें. यास्तव तुला इष्ट असेल तो वर तूं माझ्यापासून मागून घे ! तुझें कल्याण असो ! आपलें आत्यंतिक कल्याण करून घेण्यासाठीं मनुष्याला जो श्रम करावा लागतो, तो माझें दर्शन होईपर्यंतच करावा लागतो. माझें दर्शन झालें कीं श्रमाची आवश्यकताच उरत नाहीं. कारण माझ्या दर्शनाबरोबर प्रत्यक्ष मोक्षप्राप्तिच होते ॥ २० ॥

ब्रह्मदेवा, तुला या माझ्या स्थानाचें जें दर्शन झालें, तो माझ्या इच्छेचाच प्रभाव होय. कारण एकांतांत मी ' तप तप ' असे जे शब्द उच्चारिले ते ऐकूनच तूं उत्तम असें तप केलेंस ( आणि त्या तपामुळें माझ्या या लोकाचें तुला दर्शन घडलें ) ॥ २१ ॥

हे निष्पाप ब्रह्मदेवा, तुला सृष्टि कशी करावी हें जेव्हां समजेना, तेव्हां मीच तुला तप करण्याचा उपदेश केला. हें तप म्हणजे माझें प्रत्यक्ष हृदय होय आणि उलट मीहि तपाचें हृदय आहें. ( तप आणि मी हीं एकरूपच आहों ) ॥२२॥

मीं हें सारें विश्व तपाच्या योगेंच पुनः आपल्या स्वरूपांत लीन करून घेतों. विश्वाचें पोषणहि मी तपाच्या योगेंच करतों. माझें सारें दुर्घट सामर्थ्य म्हणजे तपच होय. ॥ २३ ॥

( भगवंताचें हें आश्वासनपर भाषण ऐकून ) ब्रह्मदेव म्हणाला, हे भगवन्, तुम्ही सर्व प्राणिमात्रांत प्रमुखपणें वास करतां आणि त्यांच्या हृदयाला व्यापून राहिला आहां. तुमचें ज्ञान अलौकिक आहे. अर्थात् मी जें कर्म करावयाचें मनांत आणिलें आहे, तें तुम्ही जाणतच आहां. तथापि, हे परमेश्वरा, मीं तुमच्यापाशीं एका गोष्टीची याचना करतों आणि तो माझा मनोरथ तुम्ही कृपा करून पूर्ण करा ! तुम्ही निराकार तर आहांच, तरीपण तुमचीं जीं पर आणि अपर म्हणजे सूक्ष्म आणि स्थूल अशीं रूपें विश्वरचनेच्या दृष्टीनें मानिलेलीं आहेत, त्यांचें ज्ञान मला होईल असें करा ! ॥ २४ ॥ २५ ॥

हे माधवा, कोळी ज्याप्रमाणें स्वतःच्या अंगांतून काढलेल्या धाग्यानें स्वतःला गुंडाळून घेतो, त्याप्रमाणें विविध शक्तींनीं भरून गेलेलें हें विश्व तुम्ही देखील आपल्या स्वतःच्याच मायेनें उत्पन्न करतां, त्याचें धारण करतां आणि शेवटीं त्याला आवरून घेतां.

---

* **करे स्पृशन्** म्हणजे हस्तस्पर्श करणारा. पाश्चात्य लोकांमध्यें दोन माणसांची भेट झाली म्हणजे परस्पर हस्तस्पर्श करण्याची चाल आहे. तिला हस्तांदोलन ( शेकहँड ) पूअसेंहि म्हणतात. वीं भरतखंडांतहि तशी पद्धत होती असें दिसतें.

आत्मस्वरूपानेंच तुम्हीं (त्या कार्यासाठीं) ब्रह्मदेवादिकांचीं रूपें धारण करतां व आपला संकल्प कधींच व्यर्थ जाणार नाहीं, अशा रीतीनें तुम्हीं क्रीडा करतां. तरी, या सर्व गोष्टींचें यथार्थ ज्ञान मला जेणें करून होईल अशी बुद्धि माझ्या ठिकाणीं तुम्ही उत्पन्न करा ॥ २६ ॥ २७ ॥

हे भगवन्, तुम्ही मला जो उपदेश कराल, त्याचें आचरण मी खरोखर आळस टाकून करीन, म्हणजे तुमच्या कृपेंकरून मी इच्छित सृष्टि उत्पन्न करीत असतांहि त्या कार्यानें बद्ध होणार नाहीं ॥ २८ ॥

हे देवाधिदेवा, एखाद्यानें दुसऱ्याला आपला मित्र करून घ्यावें, त्याप्रमाणें तुम्हीं मला आपलासा केलें आहे. तेव्हां सृष्टि उत्पन्न करण्याचें जें तुमच्या सेवेचें कार्य तें मीं अगदीं निर्भयपणें करीत राहीन आणि त्यासाठीं लोकांचे नाना प्रकार मी उत्पन्न करीन. पण, हें कार्य करीत असतां मी जन्मरहित आहें, या भावनेनें माझ्यामध्यें अभिमान वाढूं नये असें करा. कारण तसा गर्व झाला तर मी स्वतःला तुमच्या बरोबरीचा समजूं लागेन॥२९॥

(ब्रह्मदेवाची ही विनंति ऐकून) भगवान् म्हणाले —ब्रह्मदेवा, माझें अत्यंत गुह्य असें ज्ञान मी तुला सांगतों व त्याबरोबर अनुभवज्ञान, भक्तियोग आणि त्यांच्या प्राप्तीचीं अंगभूत साधनें हीं देखील सांगतों. तूं त्यांचें ग्रहण कर. माझें स्वरूप कसें आहे, माझी सत्ता केवढी आहे आणि माझीं रूपें, गुण आणि कर्में कोणत्या प्रकारचीं आहेत, याविषयींचें निश्चित असें यथार्थ ज्ञान माझ्या कृपेनें तुला प्राप्त होवो ! ॥ ३० ॥ ३१ ॥

सर्वांच्या आरंभीं केवळ मीच होतों, अव्यक्त किंवा व्यक्त यांच्या पलीकडे माझ्याशिवाय दुसरें कांहींच नव्हतें व सृष्टि उत्पन्न झाल्यावर पाहिलें तरी जें हें सर्व कांहीं आहे तें मीच आहें. तसेंच सृष्टीचा लय झाला म्हणजे जें अवशिष्ट राहील तेंहि मीच असावयाचें. अशा रीतीनें मी अनादि व अनंत असून, माझ्याशिवाय दुसरें कोठेंहि व केव्हांहि कांहीं नाहीं ॥ ३२ ॥

वस्तुस्थिति असेल त्याहून निराळी भासणें हा प्रकार, (एका चंद्राचे दोन चंद्र दिसणें यासारख्या) भ्रमांत अनुभवाला येतो. किंवा राहु आकाशांत असूनहि त्याचें दर्शन होऊं शकत नाहीं, त्याप्रमाणें आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं नसलेल्या गोष्टींचा प्रत्यय येतो, आणि असलेल्या गोष्टींचा प्रत्यय येत नाहीं. ह्या प्रकाराला आत्म्याची माया असें म्हटलें आहे. ॥ ३३ ॥

पृथ्वी आदिकरून महाभूतें लहान-मोठ्या प्राण्यांच्या ठिकाणीं प्रविष्ट झालेलीं दिसलीं, तरी वस्तुतः तीं (मुळापासूनच कारणरूपानें त्यांत असल्यामुळें) तशीं प्रविष्ट झालेलीं नव्हत. त्याप्रमाणें मींहि सर्व प्राण्यांमध्यें ओतप्रोत भरलेला दिसलों, तरी त्यांत

मी मागाहून प्रवेश केला असें होत नाहीं ( कारण मी तर विश्वाचें मूळ कारणच आहें, तेव्हां माझा प्रवेश विश्वांत झाला असें म्हणण्यांत स्वारस्य काय ? ) ।। ३४ ।।

अन्वय आणि व्यतिरेक या दोन्ही संबंधांनीं ज्याचें अस्तित्व सर्व काळीं आणि सर्व ठिकाणीं निश्चित ठरेल, तेंच काय तें आत्मस्वरूपाचें वास्तविक ज्ञान करून घेणाराला जाणण्यासारखें आहे. ( सच्चिदानंदस्वरूपी आत्मा सर्व विश्वाचें कारण असल्यामुळेंच सर्व भूतें व प्राणिमात्र यांचें अस्तित्व आहे असें दिसतें; अर्थात् परमात्मा विश्वाशीं अन्वित आहे आणि त्यांचा अन्वयसंबंध आहे. जागृत अवस्थेमध्यें हा अन्वयसंबंध दिसून येतो. उलट समाधि अवस्थेमध्यें सर्वांचा लय होऊन एक आत्मस्वरूप अवशिष्ट राहतें, म्हणजे सृष्टि नसेल तेव्हां आत्मस्वरूप नाहीं असें होत नाहीं. हा सृष्टि आणि आत्मा यांतील व्यतिरेकसंबंध होय. असा उलटसुलट विचार करतां एक परमात्मस्वरूप नित्य ठरतें. म्हणून त्याशिवाय इतर कशाचेंहि ज्ञान प्राप्त करून घेण्याची आवश्यकता नाहीं ) ।। ३५ ।।

( त्याप्रमाणें अत्यंत गुह्य असें आपलें ज्ञान रहस्यासह सांगून भगवान् ब्रह्मदेवाला म्हणतात; ) ब्रह्मदेवा, उत्तम प्रकारचें एकाग्र चित्त करून तूं हा उपदेश ग्रहण कर आणि त्याप्रमाणें वाग, म्हणजे तुला महाकल्पांत काय किंवा दैनिक प्रलयरूप विकल्पांत काय, कधींहि अहंकार उत्पन्न होणार नाहीं ।। ३६ ।।

शुकाचार्य म्हणतात,—परीक्षित्‌राजा, जन्मरहित अशा त्या भगवंतानें सृष्टि-कर्त्या ब्रह्मदेवाला अशा प्रकारचा उपदेश केला आणि ब्रह्मदेव पाहत असतांच आपलें स्वरूप गुप्त केलें ।। ३७ ।।

ब्रह्मदेवानें पाहिलेलें भगवंताचें रूप इंद्रियांनीं जाणतां येण्याजोगें होतें. तें गुप्त झाल्यावर ब्रह्मदेवानें त्याला हात जोडले आणि पूर्वीच्या कल्पांत केल्याप्रमाणें सृष्टि पुनः उत्पन्न केली; कारण सर्व भूतें त्याच्या स्वरूपांतच होतीं ।। ३८ ।।

ब्रह्मदेव सृष्टि उत्पन्न करणारा आणि धर्माचेंहि संरक्षण करणारा आहे. तसेंच सर्व लोकांचें कल्याण व्हावें अशी त्याची इच्छा असल्यामुळें, ती पूर्ण व्हावी म्हणून त्यानें एकदां यम आणि नियम यांचें अनुष्ठान केलें ।। ३९ ।।

राजा, नारद हा ब्रह्मदेवाचा सर्वांत आवडता पुत्र होता. तो व्रताचें अनुष्ठान करण्यांत दक्ष आणि पित्याच्या सेवेंत तत्पर असे; व त्याला भगवंताचें गुणगायन ऐकण्यांतहि प्रेम वाटे. तो मोठा मननशील आणि परमेश्वरभक्त होता. त्याला मायेचा स्वामी जो विष्णु त्याची ती माया जाणण्याची इच्छा झाली. तेव्हां त्यानें मोठ्या नम्रतेनें, सुस्वभावानें आणि इंद्रियनिग्रहपूर्वक आपल्या पित्याची सेवा करून त्याला संतुष्ट केलें ।। ४० ।। ४१ ।।

जगाचा प्रपितामह आणि आपला पिता असा तो ब्रह्मदेव संतुष्ट झाला आहे असें त्या देवर्षि नारदानें जेव्हां पाहिलें, तेव्हां, हे राजा, तूं जो प्रश्न मला विचारिलास तोच प्रश्न त्यानेंहि ब्रह्मदेवाला विचारिला ।। ४२ ।।

( तो नारदाचा प्रश्न ऐकून ) सृष्टिकर्ता ब्रह्मदेव आपल्या त्या पुत्रावर प्रसन्न झाला आणि ईश्वरानें सांगितलेलें दहा लक्षणांनीं युक्त असें हें भागवतपुराण त्यानें नारदाला सांगितलें ॥ ४३ ॥

शुकाचार्य म्हणतात, राजा, तेंच भागवत पुढें अत्यंत तेजस्वी असे व्यासमुनि सरस्वती नदीच्या तीरीं परब्रह्माचें ध्यान करीत बसले असतां नारदानें त्यांना सांगितलें ॥ ४४ ॥

राजा, आणखी विराट्पुरुषापासून हें जग कोणत्या क्रमानें उत्पन्न झालें असा प्रश्न तूं मला विचारलास; त्याचें उत्तर, तसाच तुझ्या दुसऱ्या देखील प्रश्नांचीं सविस्तर उत्तरें मीं आतां तुला सांगतों ॥ ४५ ॥

**नववा अध्याय समाप्त**

# अध्याय १० वा

शुकाचार्य म्हणतात,–हे राजा, या भागवतपुराणांत सामान्य सृष्टि, विशेष सृष्टि, संरक्षण, सृष्टिपोषण, कर्माची वासना, मन्वतरांतील आचारधर्म, परमेश्वरी लीला, सृष्टि-संहार, मोक्ष आणि ईश्वरस्वरूप अशा दहा विषयांचें विवेचन केलेलें आहे. ॥ १ ॥ या विषयांपैकीं दहावा विषय जो परमेश्वरस्वरूप त्याचें शुद्ध ज्ञान व्हावें, म्हणूनच महात्मे, साधुपुरुष, सर्ग, विसर्ग आदिकरून नऊ विषयांचें स्पष्टीकरण करतात. तें स्पष्टीकरण श्रुतिग्रंथांत प्रत्यक्ष केलेलें असतें आणि पुराणग्रंथांत कथारूपानें असतें ॥ २ ॥ सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांत न्यूनाधिक प्रमाण होऊन ब्रह्मापासून पंचमहाभूतें, त्या पंचमहाभूतांचीं विषयरूप सूक्ष्मरूपें व पंचज्ञानेंद्रियें, महत्, अहंकार इत्यादि तत्त्वाची विराट्रूपानें जी उत्पत्ति झाली तिला 'सर्ग' म्हणतात आणि त्या विराट्पुरुषापासून पुढें जी सृष्टि झाली तिला 'विसर्ग' म्हणतात ॥३॥ शुकाचार्य म्हणतात–राजा, उत्पन्न केलेल्या सृष्टींची मर्यादा पाळून तिचें रक्षण करणें, या परमेश्वराच्या विजयाला ' स्थिति ' हें नांव आहे. परमेश्वरानें आपल्या भक्तांवर कृपा करून त्यांचा उत्कर्ष करणें याला ' पोषण ' म्हणतात. सदाचरणी पुरुषांनीं घालून दिलेल्या आचरणाला ' मन्वंतर ' आणि फलाची इच्छा धरून केलेल्या कर्माला ' ऊति ' अशा संज्ञा आहेत ॥ ४ ॥ श्रीहरि आणि त्याचे भक्त यांनीं अवतार घेऊन जीं चरित्रें केलीं, त्यांच्या निरनिराळ्या आख्यानांनीं भरलेल्या ज्या कथा त्यांना ' ईशकथा ' असें म्हणतात. ॥ ५ ॥ भूतें व इंद्रियें इत्यादि आपल्या शक्तींसह आत्मा परमेश्वरस्वरूपांत लीन होतो त्याला ' निरोध ' अशी संज्ञा आहे आणि त्या परमेश्वरस्वरूपांत लीन होतांना सर्व प्रकारच्या मायिक रूपांचा त्याग करून शुद्ध अशा आत्मस्वरूपानेंच तेथें स्थिर होतो त्याला ' मुक्ति ' म्हणतात * ॥ ६ ॥ शुकाचार्य

---

१.–सर्ग १, विसर्ग २, स्थान ३, पोषण ४, ऊति ५, मन्वन्तर ६, ईशकथा ७, निरोध ८, मुक्ति ९ व आश्रय १० ह्या दहा लक्षणांनीं युक्त जें त्याला पुराण अशी संज्ञा आहे. [ स्कंध २ अध्याय ९ श्लोक ४३ पाहा. ] कित्येक ठिकाणीं " **सर्गश्च प्रतिसर्गश्च वंशो मन्वन्तराणि च ॥ वंशानुचरितं चैव पुराणं पञ्चलक्षणम् ॥** " सर्ग, प्रतिसर्ग, वंश, मन्वन्तरें व वंशानुचरित अशीं पुराणाचीं पांच लक्षणें सांगितलीं आहेत. विसर्गादि दहा लक्षणांच्या व्याख्या पुढें ३ ते ७ श्लोकांत आहेत.

* कल्पांताच्या प्रसंगीं जीवात्म्याचा ' निरोध ' झाला, तरी त्याजवळ सर्व वासना वगैरे असतातच आणि म्हणून तो पुढील कल्पांत पुनः जन्मास येतो; परंतु सर्व वासनात्यागपूर्वक असा ईश्वरस्वरूपांतच जो लीन होतो, तो ' मुक्त ' होतो व त्याला पुनः जन्म नाहीं, असा हा निरोध आणि मुक्ति यांमधील भेद आहे.

म्हणतात–राजा, ही आभासमय सृष्टि आणि तिचा अव्यक्तस्वरूपांत लय ह्या गोष्टी ज्यापासून निश्चित होतात, त्या ईश्वराला आश्रय अशी संज्ञा आहे आणि परब्रह्म किंवा परमात्मा असेंहि त्यालाच म्हणतात. ॥ ७ ॥ जो हा आध्यात्मिक म्हणजे इंद्रियांचा अभिमानी जीव आहे, तोच आधिदैविक म्हणजे त्या इंद्रियांच्या देवतारूपानें राहणारा आहे ( हे दोन वस्तुतः निराळे नाहींत, पण ) त्या उभयतांचा ज्या उपाधीमुळें वियोग होतो त्या उपाधींत त्या जीवाला आधिभौतिक रूप म्हणजे स्थूल शरीर प्राप्त होतें ॥ ८ ॥ आध्यात्मिक जीव, आधिदैविक देवता आणि आधिभौतिक शरीर[१] या तिन्हींपैकीं जेव्हां कोणतेंहि एक नसतें तेव्हां दुसऱ्या दोहोंचा कांहीं उपयोग होत नाहीं. * ( अर्थात् त्यांपैकीं स्वतंत्र असें कोणीच नाहीं. ) तेव्हां ज्याला या तिन्हींचें ज्ञान आहे असा जो आत्मा, तोच सर्वांचा आश्रयरूप असून त्याला मात्र आश्रय स्वतःचाच आहे ॥ ९ ॥ सर्वांचा आश्रयरूप असलेला हा निर्मळ विराट्पुरुष जेव्हां ब्रह्मांड फोडून बाहेर पडला, तेव्हां आपल्याला कांहीं तरी स्थान असावें अशी त्याला इच्छा उत्पन्न झाली आणि त्यानें त्यासाठीं शुद्ध असें उदक उत्पन्न केलें ॥ १० ॥

शुकाचार्य म्हणतात—राजा, नंतर तो पुरुष स्वतःच उत्पन्न केलेल्या त्या उदकांत सहस्रावधि वर्षेंपर्यंत राहिला. हें उदक ज्या अर्थी ज्या विराट् पुरुषापासून उत्पन्न झालें, त्या अर्थी त्याला नारायण + असें नांव प्राप्त झालें ॥ ११ ॥ त्या नारायणाची कृपा असेल तरच द्रव्य, * कर्म, काळ, स्वभाव आणि जीव यांचें अस्तित्व राहतें, ( व त्यांना कार्य करतां येतें ) आणि त्यानें दुर्लक्ष केलें, तर तीं नसल्यासारखींच होतात ॥ १२ ॥ अशा त्या अद्वितीय परमेश्वराला आपल्या योगनिद्रेंतून

---

१ आध्यात्मिक म्हणजे इंद्रियांचा ज्ञाता साक्षीभूत असा पुरुष. आधिदैविक म्हणजे देवतारूप, उदाहरण, चक्षुरिंद्रियाची देवता सूर्य. आधिभौतिक म्हणजे पंचमहाभूतांचा बनलेला देह. आधिभौतिक असें स्थूल शरीर जोंवर नाहीं तोंपर्यंत जीवात्म्याचें आध्यात्मिक स्वरूप आणि आधिदैविक स्वरूप एकच असतें; पण पिंडात्मक स्थूल देहाबरोबर त्या त्या दोन स्वरूपांचा वियोग होतो.

* जीव आणि देवता आहे, पण शरीर नाहीं, तर कोणत्याहि वस्तूचें ज्ञान होत नाहीं. तसेंच नुसतें शरीर आहे, पण त्याला जीव सोडून गेला, तर त्यापासूनहि ज्ञानाचा संभव नाहीं. दुसरें थोडक्यांत उदाहरण म्हणजे अंध, बधिर, इत्यादिकांचें. अशा लोकांच्या शरिरांत जीव आहे आणि स्थूल असा डोळ्याचा किंवा कानाचा पिंडहि आहे; पण इंद्रियाची देवता नसल्यामुळें तेथें ज्ञानोत्पत्ति होत नाहीं. तेव्हां अशा सर्व उपाधींपासून अलिप्त असून जो ज्ञानस्वरूप आहे, तो परमात्माच सर्वांचा आश्रयभूत होय.

+ नारा म्हणजे उदक, नारा आहेत अयन म्हणजे स्थान ज्याचें तो नारायण.

* हे शब्द स्कं. २, अ. ५, श्लोक १४ यांत आले असून कर्म, काळ आणि स्वभाव यांचीं कार्यें त्याच्याच पुढें २२ व्या श्लोकांत दिलीं आहेत.

उठल्यावर आपण क्रमाक्रमानें अनेक रूपें धारण करावीं अशी इच्छा झाली. तेव्हां त्यानें आपल्या मायेच्या योगानें आपल्या तेजोमय वीर्याचे तीन भाग केले ॥ १३ ॥ राजा, ते भाग म्हणजे अध्यात्म, अधिदैव आणि अधिभूत हे होत. त्या परमपुरुषानें आपल्या एका वीर्याचे हे तीन प्रकारचे विभाग कसे केले ते आतां सविस्तर श्रवण कर ॥ १४ ॥ तो पुरुष जेव्हां हालचाल करूं लागला, तेव्हां त्याच्या शरिरांत आकाशापासून इंद्रियशक्ति, मानसिक शक्ति आणि शारीरिक शक्ति अशा तीन शक्ति उत्पन्न झाल्या आणि त्या तीन शक्तींपासून सर्वांच्या अस्तित्वाला अवश्य असा प्राण निर्माण झाला. ॥ १५ ॥ राजाचे सेवक जसे (तो जाग्यावर असला म्हणजे ) त्याला अनुसरून वागतात, त्याप्रमाणें सर्व प्राण्यांच्या शरिरांत तो प्राण संचार करतो. प्राण आहे तोंपर्यंत इंद्रियें त्याला अनुलक्षून हालचाल करतात आणि त्या प्राणानें आपला संचार बंद केला म्हणजे इंद्रियांचीहि हालचाल बंद होते ॥ १६ ॥ तो प्राण चलनवलन करूं लागतांच त्या विराट्पुरुषाच्या उदरांत भूक आणि तहान उत्पन्न झाली आणि त्यांना अनुसरून जेव्हां त्याला पिण्याची आणि खाण्याची इच्छा झाली, तेव्हां प्रथम त्याला मुख उत्पन्न झालें * ॥ १७ ॥ मग त्या मुखापासून त्या विराट् देहाला टाळू फुटली. त्या टाळूंत जीभ उत्पन्न झाली व जिभेपासून अनेक प्रकारचे रस निर्माण झाले. म्हणूनच हे रस जिभेनें जाणतां येतात ॥ १८ ॥ पुढें त्या विराट् देहाला बोलण्याची इच्छा झाली, तेव्हां त्याच्या मुखापासून वाणी म्हणजे बोलण्याचें इंद्रिय आणि त्याची देवता अग्नि हीं उत्पन्न झालीं. या दोघांचें कार्य म्हणजेच भाषण होय. ( अशा रीतीनें मुख व वाणी उत्पन्न झालेल्या ) त्या विराट् शरिराचा बराच काळपर्यंत पाण्यांत कोंडमारा झाला. ( कारण प्राण त्यांत संचार करूं लागल्यामुळें मुख आणि वाणी एवढ्याच इंद्रियांनीं त्याचें कार्य होईना ) ॥ १९ ॥ प्राणवायु जोरानें संचार करूं लागला असतां त्या विराटाला गंध सेवन करण्याची इच्छा झाली, तेव्हां त्याला दोन नाकपुड्या फुटल्या आणि त्या नाकपुड्यांत गंधवाहक वायु व गंध सेवन करण्याचें घ्राणेंद्रिय हीं उत्पन्न झालीं ॥ २० ॥ ( एवढें झालें तरी ) त्या विराट्स्वरूपांत प्रकाश नव्हता. अशा स्थितींत त्याला स्वतः आपल्याला आणि इतरांना सुद्धां पाहावें अशी इच्छा झाली. तेव्हां त्याला दोन नेत्रगोलक फुटले आणि त्यांत तेज व पाहण्याचें इंद्रिय हीं उत्पन्न झालीं. त्यांच्यापासून रूप या विषयांचें ग्रहण होतें ॥ २१ ॥ नंतर ऋषि त्या विराट् पुरुषाचें स्तवन करूं लागले, तेव्हां तें स्तवन आपण ऐकावें अशी त्याला इच्छा झाली आणि त्यासाठीं त्याला दोन कान उत्पन्न होऊन त्याबरोबर त्यांच्या देवता, दिशा आणि ऐकण्याचें इंद्रिय हीं देखील

---

* विराट् पुरुषाच्या शरिराची उत्पत्ति श्लोक १० पासून जशी दिली आहे, तशीच सामान्य पुरुषाचीहि आहे. रेतोरूप उदक, त्यांत मग अंडाकार पेशी, तींत प्राणाचा व इंद्रियांचा प्रवेश, भूक, तहान वगैरेंची उत्पत्ति तदनुसार कर्मेंद्रियांची उत्पत्ति, इत्यादि क्रम उभयत्र सारखाच आहे. या विराट् पुरुषाच्या शरिरोत्पत्तीचें वर्णन येथें ऐतरेय उपनिषदांतील वर्णनावरून घेतलेलें दिसतें. तेथीलच कित्येक शब्द या वर्णनांत जसेच्या तसे आले आहेत.

निर्माण झालीं. याप्रमाणें शब्द या विषयाचें ग्रहण करण्याची क्रिया होऊं लागली ॥२२॥ पदार्थांच्या ठिकाणीं मऊपणा, कठीणपणा, लहानपणा, मोठेपणा, उष्णता आणि थंडी असे गुण असतात. त्यांचें ज्ञान व्हावें अशी त्या पुरुषाला इच्छा उत्पन्न झाली, तेव्हां त्याला त्वचा फुटली आणि केश व वृक्ष तींत उत्पन्न झाले. तसेंच स्पर्शदेवतात्मक असा जो वायु तो निर्माण होऊन अंतर्बाह्य व्यापून राहिला. तो वायु त्वचेच्या योगें स्पर्शविषयाचें ग्रहण करतो ॥ २३ ॥ नंतर त्या विराट् पुरुषाला अनेक प्रकारचीं कर्में करण्याची इच्छा झाली. तेव्हां त्याला दोन हात फुटले. त्या दोन हातांच्या ठिकाणीं बळ आणि त्याची देवता इन्द्र हीं उत्पन्न झालीं. देणें-घेणें हें कर्म त्या दोहोंच्या आश्रयानें होतें ॥२४॥ वाटेल तेथें जातां यावें अशी इच्छा त्या पुरुषाला नंतर उत्पन्न झाली; तेव्हां त्याला दोन पाय फुटले. पायांबरोबर त्यांची देवता स्वतः यज्ञस्वरूपी परमेश्वर हा झाला. ( त्यामुळें ) मनुष्यांकडूनहि जाण्या-येण्याची क्रिया होऊन ती यज्ञसामग्री प्राप्त करून घेतात ॥ २५ ॥ नंतर अपत्यप्राप्तीच्या आनंदाची व त्यायोगें अमरत्वाची इच्छा त्या पुरुषाला झाली, तेव्हां त्याच्यांत जननक्रियेचें स्थान म्हणजे शिस्न आणि तिचें इंद्रिय उपस्थ हीं प्रजापतिदेवतेसह उत्पन्न झाली. त्यांच्या आश्रयानें रतिसुखाची प्राप्ती होते ॥ २६ ॥ त्या विराट्पुरुषाला नंतर खाल्लेल्या अन्ना-दिकांचा निःसत्त्व अवशेष टाकून देण्याची इच्छा झाली, तेव्हां त्याला त्यासाठीं गुदनामक स्थान आणि त्या स्थानापासून वायु हें इंद्रिय अशीं प्राप्त झालीं आणि त्याबरोबर त्याची देवता मित्र हाहि निर्माण झाला. त्या उभयतांच्या योगानें मळ टाकून देण्याची क्रिया होते ॥ २७ ॥ पुढें त्या पुरुषाला एका शरिरांतून दुसऱ्या शरिरांत सरकून जावें असें वाटूं लागलें, तेव्हां त्यास नाभिस्थान उगवलें आणि त्यापासून अपान हें इंद्रिय आणि मृत्यु ही देवता उत्पन्न झाली. प्राणाचा संबंध अपानापासून तुटण्याची क्रिया म्हणजेच मृत्यु आणि तो अपानेंद्रिय व मृत्युदेवता यांच्या आश्रयानें होतो ॥ २८ ॥ ( इतकें झाल्यावर ) पुढें त्या विराट् पुरुषाला खावयाचे आणि प्यावयाचे पदार्थ सांठवावे अशी इच्छा झाली, तेव्हां त्याला उदर, आंतडीं आणि नाड्या प्राप्त झाल्या व त्यांत त्यांच्या देवता ज्या नद्या आणि समुद्र त्या उत्पन्न झाल्या. त्यांच्या योगानें शरीराला आनंद आणि पोषण यांची प्राप्ति होते ॥ २९ ॥ मग त्या पुरुषाला आपल्या मायेचें चिंतन करावें अशी इच्छा झाली. त्या वेळीं त्याला हृदय प्राप्त झालें आणि त्या हृदयापासून, मनोरूप इंद्रिय आणि मनापासून त्याची देवता चंद्र, हीं उत्पन्न झालीं. त्यांच्या योगानें विचार आणि इच्छा यांची उत्पत्ति होते ॥ ३० ॥ पृथ्वी, उदक आणि तेज या तत्त्वांनीं बनलेले त्वचा[१], चर्म, मांस, रक्त, मेद, मज्जा आणि अस्थि हे सात धातु त्या विराट् पुरुषाच्या शरिरांत नंतर उत्पन्न झाले आणि आकाश, उदक आणि वायु यांपासून प्राण उत्पन्न झाला ॥ ३१ ॥

---

१ त्वचा व चर्म हीं दोन धातूंमध्यें घेऊन सातांची भर केली आहे व रस आणि शुक्र ह्या दोन धातु अजीबात वगळल्या आहेत, ' **श्रोत्रस्त्वक्चक्षुषी जिव्हा नासिका चैव पञ्चमी** ॥ '' ह्या नियमाप्रमाणें त्वक् ज्ञानेंद्रियांत येतें, सप्तधातूंत येत नाहीं.

इंद्रियें हीं शब्द आदिकरून गुणांचीं म्हणजे विषयांचीं स्वरूपे आहेत. शब्दादि गुण हे भूतांचें मूळ जो अहंकार त्यापासून झालेले आहेत. मन सर्व प्रकारच्या विकारांनीं व्याप्त असून बुद्धि विविधज्ञानस्वरूपी होय ॥ ३२ ॥ शुकाचार्य म्हणतात–राजा, हें भगवंताचें विराट् रूप मीं तुला सांगितलें. हें रूप बाहेरून पृथ्वी वगैरे आठ कारणांनीं वेष्टिलेलें आहे ॥ ३३ ॥ या विराट् स्वरूपाहून दुसरें अत्यंत सूक्ष्म असें त्याचें रूप ÷ आहे. तें अस्पष्ट असून इंद्रियांनीं अगदीं न समजण्यासारखें आहे व त्यांच्यांत कोणतेहि विशेष धर्म नाहींत. तें अनादि तसेंच मध्यहीन आणि अनंत असें शाश्वत असून वाणी आणि मन यांच्या मर्यादेच्या बाहेर आहे. ॥ ३४ ॥ राजा, हीं भगवंताचीं दोन रूपें मी तुला क्रमानें सांगितलीं; पण तीं दोन्ही रूपें मायेनेंच उत्पन्न केलेलीं असल्यामुळें ज्ञानी पुरुष त्यांचें वास्तविक अस्तित्व मान्य करीत नाहींत * ॥ ३५ ॥ परमेश्वर हा वस्तुतः कांहींच न करणारा आहे; पण मायेच्या योगानें तो ब्रह्मदेवाचें रूप धारण करून सर्व प्रकारचीं कर्में करितो. तो मनुष्य, देव इत्यादिकांचा ज्यांच्यापासून बोध होईल अशीं राम, शंकर इत्यादि नांवें आणि त्यांना अनुरूप अशीं स्वरूपें[१] घेतो, व तशा तशा क्रियाहि करतो ॥ ३६ ।

हे परीक्षित्राजा, तो परमेश्वर दुसरींहि अनेक स्वरूपें धारण करितो. निरनिराळे प्रजापति, मनु, देव, ऋषि, पितृगण, सिद्ध, चारण आणि गंधर्व, तसेच विद्याधर, असुर, यक्ष, ॥ ३७ ॥ किन्नर, अप्सरा, नाग, साप, किंपुरुष[२], सरपटणारे प्राणी, मातृगण, राक्षस, पिशाच, प्रेत, भूत, विनायक[३] ॥ ३८ ॥ कूष्मांड, वेताळ, यातुधान, ग्रह, पक्षी, हरिण, पशु, वृक्ष, पर्वत, सरपटणारे किडे, अशीं तीं विविध स्वरूपें होत ॥ ३९ ॥

---

÷ याला 'समष्टि लिंगशरीर' असें म्हणतात. मनुष्याला म्हणजे पिंडाला जसें एक स्थूल आणि दुसरें सूक्ष्म शरीर असतें अशी कल्पना आहे, तसेंच परमेश्वराचेंहि विराट् आणि सूक्ष्म असें शरीर असतें अशी कल्पना आहे.

* या रूपांचें अस्तित्व सगुणोपासनेसाठीं मानिलेलें आहे.

१ धनुर्धारी राम, जटाभस्मधारी शंकर इत्यादि अनुरूप स्वरूपें आणि रावणवध, मदनदहन इत्यादि अनुरूप क्रिया होत. वाच्य म्हणजे ज्याला उद्देशून बोलावयाचें तो पदार्थ आणि वाचक म्हणजे त्या पदार्थाचा बोध करून देणारा शब्द.

अलंकारशास्त्रांत वाच्यार्थ लक्ष्यार्थ व व्यङ्ग्यार्थ असे तीन अर्थ दिले आहेत. शब्द उच्चारतांच त्याचा सरळ होणारा जो अर्थ त्याला वाच्यार्थ किंवा प्रत्यक्षगोचर स्वरूपार्थ म्हणतात व वाचक म्हणजे शंकर, विष्णु, गोविंद इत्यादि नांवें.

२ किंपुरुष आणि किन्नर हे शब्द एकाच अर्थाचे आहेत. तसेंच, सर्प, सरीसृप, उरग यांचाहि स्थूलार्थ एकच आहे. राक्षस, यातुधान व असुर हे एकाच वर्गातील असून प्रेत, पिशाच, भूत, कूष्मांड, विनायक, उन्माद, वेताळ हेहि एका स्थूल वर्गांत मोडतात.

३ या ठिकाणीं विनायक म्हणजे गणपति नव्हे, पिशाचाप्रमाणें क्रूर आणि विघ्नें उत्पन्न करणारा दैवतप्रकार आहे.

तसेंच आणखी पृथ्वीवर, जमिनीवर आणि आकाशांत राहणारे जे स्थावर व जंगम असे दोन प्रकारचे आणि जरायुज, अंडज, स्वेदज व उद्भिज्ज असे चार प्रकारचे जीव, त्यांचींहि रूपें तो परमेश्वरच धारण करतो. राजा, कर्मांच्या गति उत्तम, मध्यम आणि कनिष्ठ, अशा आहेत व त्या पुण्य, पाप आणि त्या दोघांचें मिश्रण यामुळें होत असतात. त्यांना सात्त्विक, राजस आणि तामस अशीं नांवें आहेत आणि त्या देव, मनुष्य आणि नरकांतील प्राणी यांना प्राप्त होतात ॥ ४० ॥

राजा, या तीन गतींचे आणखी प्रत्येकीं तीन भेद होतात. कारण कोणत्याहि दोन प्रकारांतील धर्म तिसऱ्याशीं मिसळले म्हणजे आणखी एक प्रकार बनतो * ( आणि अशा रीतीनें सात्त्विक गतींत सत्त्वप्रधान, रजःप्रधान आणि तमःप्रधान असे प्रकार होऊन एकंदर गती नऊ प्रकारच्या होतात. ) ॥ ४१ ॥ अशा प्रकारें जग उत्पन्न करणारा परमेश्वरच, धर्माचें स्वरूप धारण करून पशु, मनुष्य, देव इत्यादिकांचीं शरीरें घेऊन अवतरतो व विश्वाचें संरक्षण आणि पोषण करतो ॥ ४२ ॥ आणि वायु ज्याप्रमाणें ( आपणच रक्षण केलेल्या मेघपंक्तींचा नाश करतो, त्याप्रमाणें नंतर तोच भगवान्, काल अग्नि आणि रुद्र अशीं रूपें धारण करतो आणि जें पूर्वीं स्वतःच उत्पन्न केलेलें असतें त्याचा पुनः आपल्या स्वरूपांतच योग्य काळीं लय करतो. ॥ ४३ ॥ याप्रमाणें अत्यंत षड्गुणैश्वर्यसंपन्न अशा परमेश्वराचें स्वरूप वर्णिलेलें आहे; पण जे ज्ञानी पुरुष आहेत त्यांना परमेश्वराचें केवळ अशाच प्रकारचें म्हणजे उत्पत्ति, स्थिति आणि प्रलय करणारा, एवढेंच स्वरूप जाणणें योग्य वाटत नाहीं. कारण, ॥ ४४ ॥ राजा, परमेश्वराला उत्पत्ति, स्थिति, लय इत्यादि कर्मांचें कर्तृत्व वस्तुतः लागत नाहीं. तें मायेनें त्याच्यावर भासविलेलें असल्यामुळें वेद देखील त्याच्या माथीं हीं कर्में जी लावितात, तीं तशीं खरोखर आहेत म्हणून नव्हे, तर परमेश्वराकडे वास्तविक कर्तृत्वादि येत नाहींत हें सांगण्यासाठींच होत. ॥ ४५ ॥ राजा, ब्रह्मदेवाचा हा महाकल्प इतर लहान अशा कल्पांसह थोडक्यांत सांगितला. यांत प्रकृतीपासून झालेली महत्तत्त्वादि सृष्टि आणि पुढें प्रकृतीच्या विकारापासून झालेली संकीर्ण अशी पंचभूतात्मक सृष्टि या जशा आहेत तशाच इतर महाकल्पांतहि सामान्यपणें होतात. ॥ ४६ ॥

आतां काळाचे परिणाम आणि कल्पांचीं लक्षणें व त्यांचे मन्वंतरादि विभाग तूं मला विचारिलेस, ते मी तुला पुढें क्रमानें सांगणार आहें. त्यांपैकीं आधीं पाद्म कल्पाची सविस्तर माहिती सांगतों, ती ऐक. ॥ ४७ ॥ शौनकऋषि सूताला म्हणतात—हे सूता, तुम्ही पूर्वीं आम्हांला सांगितलें होतें कीं, भगवद्भक्तांत श्रेष्ठ असा विदुर, आपल्या बंधूंचा

---

* येथपर्यंत परमेश्वराचें सृष्टिकर्तृत्वविषयक स्वरूप वर्णन झालें. पुढें रक्षणविषयक कर्तृत्वाचें वर्णन आहे. अशा प्रकारें जग उत्पन्न करणारा परमेश्वरच, धर्माचें स्वरूप धारण करून पशु, मनुष्य, देव इत्यादिकांचीं शरीरें घेऊन अवतरतो व विश्वाचें संरक्षण करतो.

त्याग करणें अत्यंत अवघड असतांहि, तो करून पृथ्वीवर तीर्थयात्रा करीत फिरत होता ॥ ४८ ॥ त्याची आणि मैत्रेयाची गांठ पडून, त्यांचा आत्मज्ञानाच्या विषयावर जो संवाद झाला तो कोठें झाला आणि भगवान् मैत्रेयाला विदुरानें काय काय विचारिलें आणि त्यानें विदुराला काय ज्ञान सांगितलें, ( तें ऐकण्याची आमची इच्छा आहे ) ॥४९॥ हे सूता, तुमचा स्वभाव फारच शांत आहे, तर कृपा करून विदुराचें चरित्र कसें आहे, त्यानें भाऊबंदांचा त्याग करण्याचीं कारणें काय झालीं आणि मग तो पुनः घरीं परत कोणत्या कारणास्तव आला, हें सर्व तुम्ही आम्हाला सांगा ॥५०॥ शौनकाची ही विनंति ऐकून सूत म्हणाला--ऋषि हो, परीक्षित् राजानें मुनिश्रेष्ठ शुकाचार्याला प्रश्न केल्यावरून शुकाचार्यांनीं त्याला जें सांगितलें, तें त्या प्रश्नांच्या क्रमानेंच मीं तुम्हांला आतां सांगतों. सावधानचित्तानें तें ऐका ॥ ५१ ॥

**दहावा अध्याय समाप्त**

---

## दुसरा स्कंध समाप्त